शिवकालातील शुरवीर
महार योध्ये

# गोविंद गोपाळ
# व
# रायप्पा महार

चरित्र

शिवकालातील शुरवीर
महार योध्ये

# गोविंद गोपाळ
# व
# रायप्पा महार

**चरित्र**

• प्रकाशन •
दि. २३ जानेवारी १९६७

• शुभहस्ते •
प्रबोधनकार ठाकरे
वडाळा मुंबई

सिध्दप्पा मोरे

तमाशा वगासाठी

शिवकालातील शुरवीर
महार योध्ये

# गोविंद गोपाळ
# व
# रायप्पा महार

## चरित्र


• लेखक •

सिध्दप्पा मोरे

बेळगाव



• प्रथम आवृत्ती •

१ जानेवारी १९६७

मुल्य : १/-


## गोविंद उर्फ गोपाळ गणपत महार

गोविंद उर्फ गोपाळ गणपत महार (गायकवाड) यांचा जन्म रायगड किल्ल्याच्या पायथ्याशी असलेल्या पाचाड गावाचा लहान पणापासूनच शुर व धाडसी व शरीराने बलवान असणारा हा गोविंद महार पुढे शिवरायांनी रायगड किल्ल्याची बांधणी सुरु असताना त्याचे वडील गणपत महार यास हिरोजी इंदूलकराने रायगडाच्या बांधकामाचा हवालदार म्हणजे मुकादम म्हणून काम देवून कामावर रुजू करुन घेतले. गणपत महार हा मोठा बलवान व ताकदवान गडी असल्यामुळे मोठ मोठे दगड उचलण्यात त्याची कसब मोठी होती हे हेरल्यामुळेच रायगडचा वास्तु विशारद असलेल्या हिरोजी इंदूलकराने गणपत वर त्या कामाची जबाबदारी दिली होती.

गणपतने दिलेली कामे अत्यंत निष्ठेने व इमान दारीने वेळेआधीच पुर्ण करुन घेतली हे पाहून हिरोजीने गणपत महारास काही वस्तु भेट म्हणून दिली व खास मेजवाणीसाठी मी आपल्या घरी येणार असल्याचे हिरोजीने गणपत यास कळविले, ठरल्याप्रमाणे गणपतने आपल्या बायका मुलास हिरोजी इंदूलकर भेट देणार असल्याचे सांगितले हे ऐकून गणपतची पत्नी काशीबाई व गोंविद यास खुप आनंद झाला. त्याप्रमाणे हिरोजी आपल्या दोन साथीदारासह गणपतच्या पाचाड येथील छोट्याश्या झोपडीवजा घरात आला. तेव्हा काशीबाईना नमस्कार करुन समोर पाहिले, तर एक बलदंड शरिरवृष्टी असलेला तरणा बांड, मुलगा हिरोजीने पाहिला. तो मुलगा पाहून हिरोजीस प्रसन्नता वाटली, तेव्हा काशीबाईने हा आपलाच मुलगा गोविंद असल्याचे तिने हिरोजीस सांगितले.

ठरल्याप्रमाणे गणपत महाराच्या घरची जेवणावली उरकून हिरोजी इंदूलकर

रायगडाकडे आले. व त्यांनी गणपत यांस आपल्या मुलाच्या म्हणजे गोविंद बद्दल जरा चौकशी केली. तेव्हा गणपतने आपल्या मुलास स्वराज्यात सेवा करण्याची संधी मिळेल काय, असे हिरोजीस विनविले. तेव्हा हिरोजीने हे काम शिवाजी राजांच्या कानावर घालून नक्कीच केले जाईल असे आश्वासन गणपत यांस हिरोजीने दिले. पुढे थोड्याच दिवसांत शिवाजी राजे रायगडचे बांधकाम कुठपर्यंत आले आहे. हे पाहण्यासाठी रायगड येथे आले. असता रायगडाचे बांधकाम पाहून स्वत: वास्तुविशारद असलेल्या शिवरायांनी हिरोजी इंदूलकराचे कौतुक केले. आणि हिरोजीस विचारणा केली की, हे हिरोजी इतक्या कमी वेळेत तु हे काम कसे करु शकतोस तेव्हा हिरोजीने सांगितले कि महाराज गणपत सारखे बलवान शरिराचे आणि स्वराज्य निठ लोक माझ्या मदतीला असल्यामुळे हे सारे मला काम अवघड वाटत नाही. तेव्हा महाराजांनी गणपत यास बोलावून घ्या असे हिरोजीस सुचविले.

ठरल्याप्रमाणे दुसऱ्या दिवशी गणपत व त्यांच्या सोबत त्याचा मुलगा गोविंद दोघेही बापलेक शिवाजी राजाकडे रायगडावर आले. राजांनी गणपत याची प्रत्यक्ष अलिंगण देऊन भेट घेतली. त्याचा योग्य तो सन्मान केला आणि त्याच्या मुलावर म्हणजे गोविंदवर महाराजांची नजर पडली त्याच्या बलदंड शरिराकडे पाहून महाराज त्याच्याकडे एकटक पाहतच राहिले. महाराजांनी त्याची विचारपूस केल्यावर तो गणपत महाराचा मुलगा गोविंद असल्याचे समजल्यावर महाराज त्याच्यावर अधिकच प्रसन्न खुष झाले. शिवाजी राजांनाही अशा इमानदार पिळदार शरिवृष्टीच्या माणसांची स्वराज्याच्या कामी गरज भासत होती शिवाजी राजांनी तात्काळ त्याची सैन्यात भरती करुन घेण्याचे अधिकार आपल्या संबधीत अधिकाऱ्यास दिले. व भरती करुन सैन्यात घेतले. तेव्हापासून गोविंद स्वराज्याचा एकनिष्ठ सेवक बनला पुढे रायगडाचे बांधकाम पूर्ण झाल्यावर पाचाड गावी शिवरायांनी गडाखाली स्वतंत्र्य राज्यकारभार निर्मितीच केंद्र बनविण्याचा निश्चय केला. व पाचाड, वाडीतील एक मोक्याची जागा हेरुन महाराजांनी तिथे जिजाऊ माँ



साहेबासाठी गढी बांधण्याची योजना आखली. व काहीच दिवसात पाचाडची ती गढी बांधण्याची योजना आखली. व काहीच दिवसात पाचाडची ती गढी बांधून पुर्ण झाली तेव्हा तेथील जिजाऊचा राहता वाडा,आतील राजसदर, आखीव रेखीव दगडी जोती तक्क्याची विहीर व चोहोबाजूने सरक्षक कोट (भिंत) बांधून पुर्ण झाली.

तेव्हा त्या छोट्या गडाच्या रक्षणांचे काम शिवरायांनी तेथील महार समाजाच्या लोकांवर सोपविले. आजही पाचाड वाड्याच्या भोवती महार समाजाचीच वस्ती आहे. तेथील गायकवाड म्हणजे गोविंद महाराचेचं वंशज आजही तेथे वस्ती करुन आहेत. त्या काळात म्हणजे शिवरायांच्या मातोश्रीने (जिजामातेने) त्यांना उदर निर्वाहासाठी दिलेल्या शेतजमीनी आहेत. त्यानंतर गोविंद हा संभाजी राजांच्या सोबत त्यांच्या विशेष पलटणीत दाखल झाला. जेव्हा जेव्हा संभाजीराजे विशेष मोहिमेवर लढायला जात असत, तेव्हा गोविंद हा नेहमीच लढाईत अग्रेसर असे हे पाहून संभाजी राजांचा गोविंदवर फारच विश्वास प्राप्त झाला, संभाजी राजे इतकाच गोविंद गोरापान, देखणा, पिळदार शरिरवृष्टी व इमानी सेवक, पाहून संभाजी राजांनी आपला खास विश्वासू सरदार म्हणून गोविंदची नेमणूक केली तेव्हापासून संभाजीराजा व गोविंद नेहमीच एकमेकासोबत वावरु लागले.

एखादा दिवस जर काही कामाविना गोविंद जर भेटला नाही, तर राजांना (संभाजीना) तो दिवस बरोबर वाटत नसे, इतकी त्या दोघाची मैत्री झाली, तसेच गोविंद सुध्दा राजांना दररोज भेटल्याशिवाय इतर कामे करण्यात त्यांचे मन लागत नसे, इतकी घट्ट व पक्की मैत्री त्या दोघामध्ये झाली होती, पुढे शिवाजीराजे दक्षिण मोहिमेवर निघाले तेव्हा त्यानी संभाजी राजास शृंगारपूर या त्यांच्या सासरवाडीस म्हणजेच महाराणी येसुबाईच्या माहेरी, पाठविण्याचे ठरविले. तेव्हा गोविंद हा त्याच्या सोबतच, शृगारपूर येथे होता.

संभाजीराजे दिलेरखानाच्या गोटात असताना, ही गोविंदने त्यांची साथ

सोडली नाही. दिलेरखानाच्या आदेशा वरुन जेव्हा भुपाळगडावर संभाजी राजांनी हल्ला केला तेव्हा गोविंद महाराकडेच त्या सेनेचे नेतृत्व संभाजी राजांनी दिले होते. परंतु तिथे फिरगोजी नरसाळ्यासारखा मोठ्या कर्तबगारीचा व निष्ठेचा किल्लेदार असल्यामुळे गोविंदने तेथे माघार घेतली, व संभाजी राजांना सांगितले कि, आपण पुढे व्हावे, प्रत्यक्ष संभाजी राजा भुपालगडावर चाल करुन आले आहेत हे पाहिल्यावर फिरंगोजीने तेथे संभाजी राजासोबत युध्द केले नाही. किल्ला राजांच्या हवाली करुन टाकला.परंतु हे पाहून दिलेरखानाने संभाजी राजांना व गोविंद महारास विश्वासात न घेता किल्ल्यावरिल सुमारे पाचशे मावळ्यांना कैद केले. व त्याचे हातपाय तोडले, हे पाहून गोविंदाने संभाजीस दिलेरखानाला जाब विचारावा व त्याची संगत सोडून आपण पुन्हा स्वराज्यात यावे, असे सुचविले. एक प्रकारे गोविंद संभाजी राजांचा विश्वास सल्लागार म्हणूनच काम पाहू लागला पुढे गोविंदच्या सांगण्यावरुन व आपणहून दिलेरखानावर चिडून त्याचा गट सोडून संभाजीराजे पन्हाळ्यावर दाखल झाले, व तेथून राज्यकारभाराची सुत्रे हलवू लागले. संभाजी महाराजांनी सांगितलेली कामे गोविंद त्याचा विश्वासू सल्लागार म्हणून चोखपणे पार पाडत असे.

नेमके याच सुमारास म्हणजे संभाजीराजे पन्हाळागडावर असताना (३ एप्रिल १६८० वार शनिवार) विश्ववंद्य शिवराय ब्राम्हण मंत्र्याच्या कट कारस्थानाला बळी पडले. व त्यांचा रायगडावर अंत झाला. रायगडाचे दरवाजे ताबडतोब बंद करण्यात आले. व घाई घाईने त्यांनी एवढ्या मोठ्या जगजेत्या सम्राट असलेल्या, लोककल्याणकारी राजाला त्यांच्या थोरल्या पुत्राला म्हणजेच संभाजी राजांना न कळविता भडाग्णी दिला. व क्रियाकर्म उरकून घेतले, त्यात आंण्णाजी दत्तो व रहूजी सोमनाथ, या ब्राम्हण मंत्र्यांनीच शिवाजी राजाचा घात केला असावा, असा समज अनेक लेखकांनी व्यक्त केला असल्याचे दिसून येते.

या नंतर मात्र हंबीरराव मोहिते या सरसेनापती स महाराणी सोयराबाई व या दुष्ट मंत्र्याने संभाजीराजे दिलेरखाना च्या गोटातुन तावडीतुन निसटून



पन्हाळगडावर मुक्कामास असताना त्यांना तेथेच कैद करावे, असा हुकूम सोडला व त्यानुसार हे तिघे ब्राम्हण मंत्री व हंबीरराव सरसेनापती इत्यादी फौज फाट्यासह पन्हाळगडावर संभाजी राजाना कैद करण्यासाठी रवाना झाले. परंतु शिवरायाचा आदर्श असणारे मुर्तीमंत उदाहरण म्हणजेच शुर सेनापती हंबीरराव मोहिते. यांना मात्र हि गोष्ट आवडली नाही. व पटलीही नाही त्यांनी मात्र ह्या मंत्र्याचे कावे ओळखले व संभाजी राजांना खरा न्याय देण्याचे ठरवून आपला स्वतःचा मनसुबा कुणालाही कळू दिला नाही. त्यांनी पन्हाळ्याच्या पायथ्याशी जाई पर्यंत काहीही व कुणालाही स्वतःच्या मनात असणारा डाव कळू दिला नाही पन्हाळ गडाच्या पायथ्याशी पोहोचल्यावर मात्र आपल्या कडील एक विश्वासू सरदार गडावर संभाजी राजास आपणास कैद करण्यासाठी हे मंत्री आले आहेत. तेव्हा आपण सावध होऊन यांनाच कैद करावे मी आपल्या सोबत आहे असे सरसेनापती हंबीर रावांनी संभाजी राजास कळविले.

त्यानुसार निरोप पोहचताच राजांनी तात्काळ गोविंद यांस हि माहिती दिली व हंबीररावाच्या सांगण्यावरुन गडाच्या खाली उतरुन कैद करण्यासाठी आलेल्या त्या तिन मंत्र्यांस गोविंदाच्या सहाय्याने अटक केली. व त्यांना पन्हाळा गडावर नजर कैद केले व रायगडाच्या दिशेने हंबीरराव मोहिते व संभाजीराजे आपल्या आवडत्या गोविंद महारासोबत रायगडाकडे आले.

परंतु रायगडावर पोहोचल्यानंतर त्यांनी अनेक प्रकारे महाराज गेल्याचा शोक व्यक्त केला मला वडीलांच्या अंत्यसंस्काराला सुध्दा कळविले गेले नाही उलट मलाच कैद करण्याचा डाव आखल्या बद्दल त्यांना ह्या मंत्र्याची अतिशय चिड आली. नंतर त्यांनी स्वतः महाराजांचा राहिलेला विधी स्वतःच्या हस्ते पुर्ण केला.

यानंतर मात्र संभाजी राजांचा १६ जोनवारी १६८१ रोजी राज्याभिषेक झाल्यानंतर एक नामी युक्ती आखली. ती म्हणजे बऱ्हाणपूर या मुघलांच्या असणाऱ्या सुसज्ञ व संपन्न बाजारपेठेवर छापा घालण्याची आणि तशी योजना त्यांनी प्रथम गोविंद यांस बोलून दाखवली गोविंद हा नेहमी संभाजी राजासोबत

रहात असे. राजांचा तो आता एकदम विश्वासु व इमानदार साथीदार बनला होता राजे नेहमी गोविंदास आपला मनसुबा सांगत असत एखादी कल्पना आपल्या मनात आलीच तर ते गोविंदा जवळ मनमोकळेपणाने बोलत असत. कारण हिच माणसे आपल्या जिवाला जीव देणारे आहेत. हे आता संभाजीराजे ओळखून होते.

बऱ्हाणपूर येथे संभाजीराजे राज्याभिषेक झाल्यानंतर अवघ्या १४ दिवसातच पोहोचले तेथे त्यांनी बऱ्हाणपूरवर छापा घालून प्रचंड दहशत माजवून मोठी लुट मिळविली आणि ती लुट केलेली संपत्ती गोविंद याजकडे रायगडावर पोहोच करण्यासाठी व करण्याची जबाबदारी सोपविली. त्यानुसार हि मोठी जबाबदारी पेलण्याचे काम गोविंद महाराने मोठ्या जिद्दीने व धाडसाने केले, स्वराज्याचे हे धन गोविंदाने रायगडावर सुखरुप आडमार्गाने पोहोच केले. स्वराज्याच्या स्थापनेच्या कार्यात महार समाजाचा मोठा वाटा असल्याचे इतिहास वाचल्यावर लक्षात येते. परंतु काही नतदृष्ट भट लेखकांनी अशा या शुरविर, नरविर महार सैनिकांनी केलेल्या पराक्रमांची साक्ष इतिहासातील पानावरुन नाहीशी करुन टाकली आहे. शिवरायांचे स्वराज्य वाढविण्याचे काम या महार जातीच्या लोकांनी इमाने, इतबारे केले आहे.

त्यांनी गडरक्षणाच्या कामाबरोबरच मोठमोठ्या लढायात पुढे होऊन आपल्या प्राणांची बाजी लावल्याचे आढळते. शत्रु जेव्हा गडाखाली वेढा देवून बसला असल्याचे लक्षात आल्यावर गडावरुन मोठमोठ्या दगडाचा मारा करण्यात महार सैनिक अत्यंत पटाईत असत. कारण बळदंड शरिर यष्टीचे हे महार सैनिक विना शस्त्राने शत्रु केवळ दगडाने मारा करुन पळवून लावीत असत, अशा या शुरविर महार मावळ्यांचा इतिहास आज पुसुन टाकण्यात आला आहे तेव्हा या शुर महार विरांना पुन्हा न्याय देण्याचा व त्यांचा इतिहासातील पराक्रम पुन्हा लोकांसमोर येण्यासाठी मी अतिशय बारिक अभ्यास करुन लिखाणं करत आहे.

शिवाजी महाराजांच्या निर्वाणानंतर संभाजीराजे अभिषिक्त छत्रपती झाले. राज्यकारभाराची घडी अतिशय व्यवस्थितपणे व चोख रितीने पार पाडत असताना



औरंगपुत्र अकबर हा संभाजी राजास येऊन मिळाला. औरंगजेबाची आवडती पत्नी दिलरास पासुन झालेला मुलगा अकबर याने औरंगजेब बादशहा विरुध्द बंड केले अकबर हा एक शुर योध्दा होता त्याने रजपूत सरदार, दुर्गादास राठोड यांच्या मदतीने ११ मे १६८१ रोजी संभाजी राजास पत्र लिहीले. पत्रात त्यांनी आपणास भेटण्याचे आवाहन शंभुराजास केले परंतु संभाजी राजांनी त्याची लगेच भेट घेण्याचे नाकारले. कारण या प्रकरणात कोणती निश्चीत भुमिका घ्यावी हे ठरले नसावे.

कोकणात सुधागड किल्ल्याजवळ धोंडसे नावाचे एक गाव आहे त्याच्या दक्षिणेस म्हणजे सुधागड किल्ल्याच्या पायथ्यासी एक वाडी आहे तेथे गवताळ छपरात हिन्दुस्थानचा पातशहा बनण्याची इच्छा बाळगणाऱ्या अकबर राजपुत्राची सोय शंभुराजानी केली होती. अकबर ५०० सैन्य काही उंट घोडे घेऊन आला होता त्याचा खर्च संभाजी राजाकडून केला जात असे शिवाय अकबरास रोज ६० होन वैयक्तीक खर्चासाठी दिले जात असे अकबराचे रक्षण करण्याकरिता ३०० हशम व व्यवस्था पाहण्यासाठी अंण्णाजी दत्तो, बाळाजी आवजी आणि हिरोजी फर्जंद यांची नेमणूक करण्यात आली होती.

ऑगस्ट १६८१ मध्ये संभाजी राजाला अन्नातून विषप्रयोग करण्याचा एक कट उघडकिस आला म्हणून संभाजीराजे सगळ्याच गोष्टीबद्दल साशंक बनले. सुर्याजी निकम बापु माळी व संभाजी बंकी यांना या फसलेल्या कटामध्ये सामील झाल्यामुळे त्यांना ठार मारावे लागले गोविंद महारानेच हा त्याचा डाव उघडकिस आणला.

अकबर मात्र संभाजी राजांशी चर्चा होण्यात वेळ लागल्याबद्दल बेचेत झाला होता परंतु दुर्गादास राठोड त्यांना समजविण्याचा प्रयत्न करित होता. दुर्गादास राठोडचा शहाणपणा आणि आपल्या मुत्सद्याचा अविचार, या मुळे एक नवीनच प्रकरण उघडे पडले.

आण्णाजी दत्तो व अदि ब्राम्हण सरकारकून व इतर अधिकाऱ्यांनी संभाजी महाराजांना अकबराच्या मदतीने विष पाजून ठार मारण्याचा कट आखला होता. त्याची माहिती अकबरानेच गोविंद मार्फत संभाजी राजास कळविली त्यांच्या विषयी उरल्या. सुरल्या संशयाच पुर्ण निराकारण होऊन त्याच्या उपकाराची परत फेड म्हणून संभाजी राजांनी अकबरास आश्रय देण्याचा धाडसी निर्णय घेतला, मात्र हि गोष्ट समजताच ७ सप्टेंबर १६८१ स्वत: औरंगजेब आफाट सैन्यासह अकबरास पकडण्यासाठी व संभाजी राजास धडा शिकविण्यासाठी अजमेर हून एक शपथ घेऊन निघाला.

संभाजी महाराजांनी शहाजादा अकबरास पुर्ण पणे आश्रय दिला. अकबराने संभाजी राजांना त्यांच्या सरकारकूनापासून धोका असण्याची माहिती त्वरेने गोविंद याजकरवी संभाजी राजास कळविली. संभाजी राजांनी कटकारस्थान रचणाऱ्यास पकडले आणि त्यांना हत्तीच्या पायी देऊन ठार मारावे, असा हुकूम सोडला व गोविंद महारास व कवी कलश यास हुकूमाची अंमलबजावणी करण्यास सांगण्यात आले. पालीजवळील परली गावाजवळ औंढा गावच्या संगमाशेजारी या कट कारस्थान रचलेल्या लोकांना गोविंदने प्रथम चाबकाने पाठ फुटेस्तोवर फोडून काढले, त्या भयंकर मारानेच आळाजी दत्तो सचिव हा कटकारस्थान रचणारा ब्राम्हण सचिव सरकारकून मरण पावला चिटणीस बाळाजी आवजी त्याचा भाऊ शामजी आवजी आण्णाजी दत्तोचा भाऊ सोमाजी दत्तो आणि हिरोजी फर्जद यांना १४ ऑगस्ट १६८१ या दिवशी कट कारस्थान रचल्या बद्दल हत्तीच्या पायाखाली देऊन ठार मारण्यात आले हे सर्व काम निधड्या छातीच्या गोविंदाने संभाजी राजांच्या सांगणीवरुन केले ब्राम्हण मंत्री मारुन गोविंदाने आपली निष्ठा दाखविण्याचे मोठे काम त्याने केले. इतिहास लिहीताना गोविंदचे शौर्य धाडस याचं वर्णन लेखनं बहाददरांनी बाजुला ठेवलेले दिसते.

पुढे औरंगजेब जेव्हा महाराष्ट्र भुमिवर आपली सुमारे सात लाखाची फौज घेऊन आदळला तेव्हा संभाजी राजांनी परिस्थिती ओळखुन सर्व गड किल्ल्यावर



पाचाड गाव रायगडाच्या शेजारी आहे

विशेष दारुकोठा धन्य धान्य चारा पुरेशी सैनिक व्यवस्था त्याचा सामना करण्यासाठी संपूर्ण तयारी केली. असाचं एक मोठा रणसंग्राम आता मी आपल्याला लेखणातुन माहिती करुन देतो.

औरंगजेब प्रथम औरंगाबाद येथे आल्यावर त्याने मोघल आक्रमणाची सुत्रे आपल्या हातात घेतली आल्या आल्या शिवाजी राजांच्या स्वराज्याला तडा देण्यासाठी त्याचे किल्ले ताब्यात घेणे आवश्यक वाटून त्याने आपला सेनापती शहाबुद्दीन फिरोजजंग याला नाशिक जवळील रामसेजचा किल्ला जिंकून घेण्यास सांगितले हा गड नाशिक शहराच्या उत्तरेला सात मैलावर दिंडोरी तालुक्यात आहे हा किल्ला जिंकण्यास फारसा कठीण नसल्याने प्रथम तो जिंकून प्रथम भवानी करायची असं ठरवून त्यानेटाकले.

रामसेज किल्ल्यावर मावळे फौज फक्त ६०० च्या आसपास होती, तर शहाबुद्दीन, फिरोजजंग, इ ३५ ते ४०,००० सैन्य प्रचंड दारुगोळा तोफखाना अशा तयारीनीशी रामसेजवर चालून आला आहे, हे समजताचं संभाजी राजांनी रामशेजच्या रक्षणासाठी गोविंद महार, मानाजी मोरे, रंभाजी पवार यांना मानाची वस्त्रे देऊन रामसेज किल्ल्याचे रक्षण करण्याची जबाबदारी सोपविली, रामसेजला शहाबुद्दीन खानाने वेगेच, पुर्णपणे मोठा वेढा घातला. त्यांच्याबरोबर अनेक कसलेले सेनापती होते अनेक लढवय्ये सरदार होते. (१६८२) रामसेजचा किल्लेदार म्हणजे नवीनच पाठविलेला गोविंद महार मोठा कल्पक व अनुभवी व कसलेला स्वराज्यनिष्ठ माणूस होता काही इतिहासकारांनी त्याचे नाव अज्ञात ठेवले आहे परं गोविंद महार हाच गडावर नवीन किल्लेदार म्हणून त्याची नेमणूक संभाजी राजां केली होती. माहीत असुनही काही इतिहासकार त्याचे नावही माहीत नाहीअसं लिहिताना जाणवते किल्ल्यावर धान्यसाठा मात्र भरपूर प्रमाणात होता, मात्र तोफा नव्हत्याच गोविंदाने अत्यंत बुध्दी कौशल्य वापरुन लाकडी तोफा तयार करून घेतल्या. त्यातून किल्ल्यामध्ये साठवून ठेवलेल्या कातड्याचा उलट मारा सुरू केला. तो अत्यंत परिणामकारक ठरला त्याने शत्रुने केलेले हल्ले व सुरुंग

नष्ट केले. मराठे रात्री अपरात्री मोगल सैनिकांवर तुटून पडून कापाकापी करुन वेळीच पुन्हा किल्ल्यावर परत फिरत असत. शहाबुद्दीनने पराक्रमाची पराकाष्टा केली किल्ल्याच्या तटबंदीवर परिणाम कारक मारा करता यावा म्हणून किल्ल्यासमोरच्या उंच टेकडीवर एक प्रचंड लाकडी बुरुंज उभारुन त्यावरुन शहाबुद्दीनने बुरंजावर तोफांचा मारा सुरु केला, पण किलेदार गोविंद महाराने आवेशाने प्रतिकार करुन शहाबुद्दीनच्या आशेवर पुर्णपणे पाणी फिरविले चार आठवडे संपले, तरी रामसेज किल्ल्यावरील मराठी सैन्याचा आवेश वाढतच गेला.

त्यातच किल्ल्याच्या मदतीला शंभुराजांनी ७ हजाराची फौज व रुपाजी भोसले यांना गोविंदाच्या हाताखाली मदतीस पाठविले. त्यांनी रामसेजला वेढा घालून बसलेल्या मोगली सैन्यावर असा अचानक जबरदस्त हल्ला केला की, शहाबुद्दीन वेढा सोडूनच पळाला त्याने थेट जुन्नर गाठले.

यानंतर औरंगजेबाने पेडगावचा शहाणा ओळखून असणारा बहादूरखान यास ताबडतोब किल्ला घेण्यास खानाकडे पाठविले त्यानेही अता एक युक्ती वापरायचे ठरविले अवघा मारा एका बाजूने करायचा, सैन्याची हलवाहलव करुन, सारा जोर तिकडून दाखवायचा म्हणजे गडावरील मराठे सैनिक तिकडे गोळा होतील, मग मागच्या बाजुने चार दोन सैनिकांनी डोंगर चढून वर जायचे व तटावर चढून कमरेचे दोर खाली सोडायचे व मोगली सैन्यास वर घ्यायचे, मोगली सैनिक आत घुसले कि, किल्ला आपलाच झाला असा समजायचं असं ठरवून बहादूरखान मनाशी खुदकन हसला, आता सरसी आपलीच होणार म्हणून मनात तो खुश झाला.

ठरल्याप्रमाणे सारं एकदम व्यवस्थित पार पडलं अगदी तेही अपेक्षित असंच झाल तटावरच्या मोगली सैनिकांनी सोडलेल्या दोरांना गल सैनिक चिकटून डोंगर चढत होते. एवढ्यात तटावर दोर घट्ट धरुन ठेवल्या मोगली सैनिकांच्या डोक्यात इतक्या जोरातगोटे टाकण्यात आले, की त्या डोकेच जागेवर चेंदामेंदा होऊन दोराला लटकलेले मोगली सैन्य इतक्या उंचीवरुन खाली पडले कि सर्वच्या सर्व मोगल सैनिक दरित पडून मेले. खाली असणा-या



सैनिकास, गोफण, व दगडाचा मारा करुन त्यांची डोकी फोडण्यात आली. कित्येक जण जागेवरच अल्लाला प्यारे झाले. कित्येक मोगली सैनिकांची दगड गोट्याच्या माराने हातपाय तुटले. कित्येक जण जागेवरच विव्हळत पडले आणि त्यांनी पळापळ व आरडा ओरडा सुरु केला.

आपली ही पण युक्ती फसली, म्हणून बहादूरखान थोडाच गप्प बसणार होता? त्याने एक नवीन युक्ती लढविली ती अशी की, मराठ्यांना काहीतरी जादूटोणां येत असणार, हि अफवा गोविंदाने मोगल सैनिकांत पसरविली. म्हणून बहादूरखानाने एका नामकित मांत्रिक बाबास बोलावून घेतले, मांत्रिक बाबानेही मोगलांनी लुटण्याच्या बहाण्याने एक युक्ती बहादूरखानास सांगितली, मग एका नामांकीत सोनाराकडून शंभर तोळ्याचा म्हणजेच एक किलो सव्वाशे ग्रॅम वजनाचा साप तयार करुन घ्यायचा व तो मंत्राने भारायचा, त्याच्या पाठोपाठ जाणाऱ्या सैनिकांना मग कशाचीच भिती राहणार नाही. हि कल्पना यशस्वी होणार म्हणून मांत्रिकाने बहादूर खानास सांगितले.

बहादूरखान आता खुप खुष झाला. शेवटी तो दिवस ठरला. मांत्रिकाच्या हाताखालचा देखणा सोन्याचा साप, त्याच्या मागुन येणारी मोगल सैनिकांची रांग हळू हळू गड चढू लागली. अर्धा अधिक गडावर काहीही अडचणीशिवाय चढतां आले, अन् हातात मावेल एवढ्या मोठ्या दगडगोट्याचा वर्षाव उंचावरुन सुरु झाला. तो सोन्याचा साप, मांत्रिक बाबा, अन् बावळट मोगल सैनिक, यांची त्रेधातिरपीट उडाली. हा सुध्दा बेत फसला, कित्येक सैनिक यांची त्रेधातिरपीट उडाली. हा सुध्दा बेत फसला, कित्येक सैनिक व मांत्रिक रक्त बंबाळ झाले, तो साप फेकून देऊन मांत्रिक बाबानेही पळ काढला हि गोष्ट फसली, व बहादूरखान हताश झाला. लाखो रुपये वाया गेले दोन मातब्बर सेनापतींचा सपसेल पराभव आणि वर्षभर वेढा आवळून सुध्दा रामसेजने धडा शिकविला.

आता कासीमखान किरमाणी नेतृत्व घेऊन पुढे सरकला, पण दरम्यानच्या काळात संभाजीराजांनी या शुर नेकदार गोविंद महारास किल्लेदाराची वस्त्रे, अन्

भरपूर कुमक पोहोच केली होती. एक वर्ष उलटले. दोन तीन पाच वर्षे उलटले, वेढ्याचे पाच वाढदिवस साजरे झाले. पण हे रामसेज नावाचं टेकुड आपल्या माथ्यावरचा भगवा ध्वज डौलाने फडकवीत होते. औरंगजेब चिडला, आणि त्याने डोक्यावरील रत्नजडीत मुगुट खाली काढून ठेवला. जोवर किल्ला घेण्यास यश मिळत नाही तोवर हा मुगुट मी डोक्यावर घालणार नाही अशी शपथ त्याने घेतली औरंगजेबाला बोडक्या डोक्यानं फिरविणारा गोविंदा हा एकमेव संभाजी राजाचां सेवक ठरला.

बादशहा औरंगजेबाला आता कोणत्याही परिस्थितीत रामसेज हवा होता. कारण शहाजहान बादशहाने दक्षिणेत स्वारी केली तेव्हा त्याने पहिल्याच सुरुवातीला रामशेजचा किल्ला जिंकला होता. आणि त्यामुळे त्याला पुढेही झटपट यश मिळू लागले होते म्हणून रामसेज हा किल्ला शुभशकून म्हणून जिंकायलाच हवा, असं औरंगजेबाला वाटत होत. शेवटी ह्या शुरवीर गोविंदाची बदली केली गेली, अन् नंतर आलेल्या किल्लेदाराने फितुर होऊन रामसेज औरंगजेबाच्या स्वाधीन केला, अशा शुरवीर गोविंदाची कर्तबगारी मात्र काही नतदृष्ट लेखकांनी बाजूला ठेवून लिखाण केलं असं म्हणावयास हरकत नसावी त्याची कर्तबगारी श्रेष्ठता आता समाजासमोर आता खऱ्या स्वरूपात येवू लागली आहे त्याचा आता अभिमान बाळगण्याची अवश्यकता आहे गोविंद महाराकडे संभाजीराजानी आता एकां मोठ्या पथकाची जबाबदारी दिली ती म्हणजे, औरंगजेबाच्या आदेशानुसार रणमस्तखानं आता कोकणात घुसला, आणि त्याने कोकण ताब्यात घेण्याचे मनसुबे रचले, मुकरबखान सिद्दी, याकुबखान, रुमीखान दारुदखान, रामसिंह राठोड, हरिसिंह राठोड पदमसिंह राठोड, अशी नामांकित सरदारं मंडळी दुसऱ्या कौकण मोहिमेत उतरली.

कल्याणवर चालून आलेल्या रणमस्तखानाचा बंदोबस्त करण्यासाठी संभाजीराजे स्वतः चालून गेले. त्याच्याबरोबर रुपाजी भोसले गोविंद महार, केसोपंत, रायप्पा महार, निळोपंत असे बारा हजाराच पायदळ व दहा हजार



घोडेस्वार कल्याण जवळच्या टिटवाळ्या नजीक तुंबळ युद्ध झाले. पदमसिंह राठोड, व रामसिंह राठोड मारले गेले हरिसिंह राठोड पकडला गेला. शंभुराजांच्या सेनेने मोठाच पराक्रम केला प्रचंड विजय संपादन झाला (२७ फेब्रुवारी १६८३) रणमस्तखानाला गोविंद महाराच्या सेनेनं रोखलं ते कोकणातुन घाटावर पळून जाण्याच्या प्रयत्न करु लागले. मात्र रणमस्तखान घाटाच्या पायथ्याशी मराठ्यांच्या कोंडीत सापडला चढाईमध्ये स्वतः संभाजीराजांनी नेतृत्त केले होते.

औरंगजेबाला हि बातमी समजताच रुहुल्लाखान बक्षी, या आपल्या नामांकित सरदाराला रणमस्तखानाची सुटका करण्यासाठी आठ हजाराची फौज देऊन पाठविले तो कोकणात उतरला, तो घाटाखाली उतरताचं गोविंद महाराच्या जबरदस्त तुकडी ने त्याच्यावर जोरदार हल्ला केला, त्यांच्यावर रुहुल्लाखानाने गोळीबार करुन प्रत्युत्तर दिले. गोळीबार झाल्यामुळे मराठ्याची पळापळ सुरु झाली गोविंद त्यामध्ये जखमी झाला व खाली पडला त्याला मोगल सैनिकांनी ताब्यात घेतले. या शुरविराची सुटका करुन घेण्यासाठी रुहुल्लाखानास दोन लाख होनांची खंडणी देण्याची तयारी दर्शवली, त्यावरुन हा वीर महार योध्दा किती शुर असावा. रुहुल्लाखानाने पैशाच्या बदल्यात, त्याची सुटका करण्याचे नाकारले आणि त्याच वेळेस मराठ्यांची दुसरी तुकडी तेथे येऊन धडकली आणि त्यांनी सर्वांनी मिळून रुहुल्लाखानास गराडा घातला. मराठ्यांची जवळ जवळ पस्तीस हजारांची फौज तिथे जमा झाली.

रणमस्तखानाला सोडविण्यास आलेला रुहुल्लाखान पुरताच दमछाक झाला त्याने दुत पाठवून औरंगजेबाकडे आणखी सैन्य पाठविण्याची मागणी केली. अखेर गोविंदास सोडविण्याच्या अटीवर मराठ्यांनी रुहुल्लांखानास सोडून दिले. आधी ठरल्याप्रमाणे दोन-लाख रुपये जर घेतले असते, तर पैसेही मिळाले असते अन् रुहुल्लाखानानी पुर्णपणे मराठ्यासमोर माघार घेतली या अपयशाबद्दल सुध्दा त्याच्या मनात रुख रुख झाली होती.

यानंतर गोविंदाच्या जखमेवर इलाज करण्यासाठी त्याची रवानगी

रायगडावर करण्यात आली, सुमारे दोन महिने गोविंदावर इलाज करण्यात गेली एवढी मोठी जखम गोळी लागल्यामुळे झाली होती. गोविंद आता दुखण्यातुन पुर्णपणे बरा झाला होता संभाजी राजावर असलेले गोविंदाचे अपार प्रेम गोविंदाला थांबु देत नव्हते. अशातच संभाजी राजांनी एक मोहीम हाती घेतली गोव्यापासुन तीन किलोमीटर असलेल्या या किल्यावर संभाजी राजानी हल्ला करण्याचे ठरविले बऱ्याच पुस्तकात या किल्ल्याला सेंट स्टफीनचा किल्ला असा उल्लेख असला, तरी हा सेंट स्टिफनचा किल्ला म्हणजेच कुंभार जुव्याचा किल्लाच होय, ह्या मोहीमेवर जाताना गोविंद व त्यांच्याबरोबर फक्त ४० मावळे घेऊन महाराज स्वत: ३०० मावळे घेऊन कुंभार जुव्याच्या किल्ल्यावर आले संभाजीराजाच्या सैनिकांनी हा किल्ला जिंकला, तेव्हा ३०० जणाची प्रचंड फौज घेऊन अलव्होरने तेथे हल्ला चढविला कारण किल्ल्यामध्ये फक्त गोविंद आणि त्याचे ४० साथीदार होते. जातांना शेतीचे बांध फोडून त्याने चोहोकडे पाणीच पाणी करुन टाकले होते मराठ्यांची फौज किल्ल्यात पोहोचू नये म्हणून हा सगळा खटाटोप त्यांनी केला होता मराठ्यांनी किल्ला खाली केला, परंतु मराठ्याची दुसरी ३०० मावळ्यांची टोळी किल्ल्यात घुसली शेतीचे बांध फुटल्यामुळे सगळी कडे पाणीच पाणी झाले होती. अन् मागून स्वत: वीर संभाजी चालून येत होता.

आता आपली घटका भरली आहे, हे व्हाईसराय समजुन चुकला, परंतु त्याला आयत्या वेळी एक नौका सापडली आणि डोळ्यादेखत व्हाईसरॉयने तेथून जीवघेणा पळ काढला हे संभाजी राजांनी पाहिले, त्यांनी घोडी तशीच पाण्यात घातली पण घोडा पाण्यात वाहून जावू लागला खंडो बल्लाळने तशीच पाण्यात उडी मारुन घोडा पकडला आणि राजांना बाहेर सुखरुपणे आणले व गोविंदचा सन्मान करुन तेथील किल्ल्यावर किल्लेदार म्हणून नेमणूक केली.

हंबीरराव मोहिते सरसेनापती कडून गोविंदास बोलविणे आले आणि वाईजवळ सर्जाखान हा मोगल सेनापती आला आहे हे समजल्यावर गोविंदाने ह्या वेळेस खुपच शौर्य दाखविले, सर्जाखानांची एक तुकडी गारद केली. हंबीरराव



आघाडीवर असताना सर्जाखानाने डागलेला एक तोफेचा मोठा गोळाच हंबीरराव मोहित्याच्या पाठीत येवून आदळला व हंबीरराव या लढाईत गतप्राण झाले मराठी फौज हंबीरराव पडला त्यामुळे पळ काढू लागली, अशातच गोविंद महार त्यांना आडवा होऊन लढण्यासाठी प्रेरित करु लागला गोविंदने पराक्रमाची शर्थ केली आणि सर्जाखानाला तेथून पिटाळून लावले. संभाजी राजांना हि बातमी कळल्यावर अतिव दु:ख झाले. एक प्रकारे संभाजीराजाचा खडगहस्त च नष्ट झाला. परंतु गोविंदनी दाखविलेल्या पराक्रमानी महाराज त्याचेवर खुष झाले.

इकडे हंबीरराव मोहित्यासारखा पराक्रमी योध्दा पडल्यामुळे औरंगजेब मनोमन खुष झाला. त्याला आता एक मोठी आशा निर्माण झाली कि, आता संभाजीस त्याचे सगेसोयरे साथ करणार नाहीत. अशातच त्याने फंद फितुरीचा एक डाव टाकण्याचे ठरवून संभाजी राजांचा सख्खा मेहूणा असलेला गणोजी यांस फितुरी घडवून आणण्याचे कटकारस्थान रचले.

शेख निजामास (मुकरबखान) औरंगजेबाने याच वेळेस कोल्हापूर पन्हाळा भागात सैन्य देऊन रवाना केले. नेमके या वेळी संभाजीराजे शिर्क्यांचा बंदोबस्त करण्यासाठी त्या भागात आले, हि बातमी गणोजी शिर्के यांस समजताच संभाजी राजास घाबरुन गणोजी शिर्के पळून गेला, हि गोष्ट संभाजी राजास समजताच त्यांनी आपला मोर्चा मागे वळविला ते रायगडाकडे कुच करण्यासाठी रवाना झाले, वाटेत रत्नागिरी जिल्ह्यातील संगमेश्वर येथे संभाजीराजे थांबले असतानाच, गणोजी शिर्के मुकरब खानाला येवून मिळाला, व तेथे रामदासाचा एक शिष्य रंगदास स्वामी यांस बरोबर घेऊन त्यांनी जवळ्या असणाऱ्या गुप्त मार्गाने मुकरबखानास संगमेश्वराची वाट दाखविली.

इकडे संभाजीराजे रायगडाकडे संगमेश्वर सोडून निघाले, असतानाचा संभाजी राजे संगमेश्वर येथे आले आहेत. हि बातमी तेथील शेतकऱ्यांना समजल्यावर त्यांनी राजांची वेळ मागवून आपली गाऱ्हाणी त्यांच्या कानावर घालण्यास सुरवात केली. त्यामुळे शेतकऱ्यांच्या जटील समस्या असल्यामुळे

राजांनी सोबत असलेले काही शुरविर मावळे त्यात संताजी घोरपडे, रायप्पा महार, गोविंद महार व इतर सुमारे ६०० मावळे पुढे पाठवून दिले सोबत फक्त म्हाळोजी काका, घोरपडे, व पन्नास, साठ लोकच ठेवून घेतले. आणि त्यांना असं सांगण्यात आलं कि, पुढील चिपळूणच्या मुक्कामी आपण भेटू तेव्हा तुम्ही ताबडतोब पुढे व्हा, राजांची आज्ञा असल्यामुळे हि सगळी शुर मावळी मंडळी पुढे निघून गेली इकडे राजे शेतकऱ्यांची समस्या जाणून घेवून त्यांना मदतीसाठी काही रक्कम सरकारी खर्चातून देत असतानाच, अचानक मुकबरखानाचा वेढा पडला, तेथे खुप मोठी धुमचक्री झाली. राजांचे सैन्यबळ कमी असल्यामुळे राजांचा त्याठिकाणी मोठा पराभव होऊन राजे त्याचा सोबती असलेल्या कवी कलशा सोबत पकडले गेले. (इथे संभाजी राजांचे विस्तृत्व चरित्र लिहीत नाही, कारण हा रणसंग्राम संभाजी राजांच्या चरित्रामध्ये आलेला आहे इथे गोविंद महाराचे शुरत्व आणि पराक्रम हा विषय घेतला असल्यामुळे तेथे घडलेला इतिहास वर्णन केला नाही).

संभाजी राजांना शेख निजाम उर्फ मुकरबखानाने दोर खंडास बांधून घोड्यावर बसवून कराड,मिरज, फलटण, बारामती मार्गे बहादूरगड येथे आणले. त्यावेळी औरंगजेब अकलूज येथे होता. त्याला हि बातमी समजल्यावर त्यानेच बहादूरगडावर संभाजीस घेऊन या, असा हुकूम सोडला, त्यानुसार संभाजीराजे व कवि कलश बहादूर गडावर कैद करण्यात आले.

इकडे संभाजीराजे मागावून का आले नाहीत म्हणून संताजी घोरपडे, गोविंदा महार, ज्योत्याजी केसरकर रायप्पा महार काळजीत पडले. तेव्हा दुसऱ्याच दिवशी त्यांना संभाजीराजे पकडले गेल्याची खबर मिळाली. ह्या सर्वांना राजे पकडल्याचे अतिशय दु:ख झाले. आता काय करावे. कोठे शोध घ्यावां, म्हणून ते ताबडतोब रायगडावर आले व महाराणी येसुबाई यांच्या कानावर हि बातमी घातली. हि बातमी ऐकून येसुबाई महाराणी साहेबांना मोठा धक्का बसला, परंतु अशा परिस्थिती मध्ये सुध्दा त्या सावरल्या व त्यांनी ताबडतोब संभाजी राजांना नेमके कुठे घेऊन गेले आहेत हे शोधण्यासाठी शोधपथके तयार केली. त्यात संताजी घोरपडे यांना दहा



हजाराची फौज शोधकार्यासाठी दिली. गोविंद यांस गुप्तहेराचे काम दिले त्याच्यासोबत आपल्या माहेरची विश्वासु माणसे म्हणजे शिर्के मंडळी दिली. गोविंदाने प्रथम आपल्या हुशारीच्या बळावर पुणे भागात येवून शोधाशोध केली, संताजी घोरपडे मात्र कराडच्या मोगली तळावर येवून त्यांनी तेथील मुघल छावणीत घुसुन मोठा हल्ला केला त्यामध्ये त्यांनी तेथील तळप्रमुख असलेल्या सुभेदार यास पकडून बेदम मारहाण करुन जिवे मारण्याची धमकी दिली, तेव्हा त्याने आपले नाव शकीर महमंद असल्याचे सांगून संभाजी राजास बहादूर गड मौजे पेंडगाव जि. अहमदनगर येथे नेऊन कैद केल्याचे सांगितले तेव्हा त्यास संताजी घोरपडे याने सोडून दिले.

परंतु त्याने जिवाच्या भितीने हि गोष्ट संताजीस सांगितली होती, त्याने पुन्हा असेही, केले कि, ताबडतोब एक स्वार पाठवून बहादूर गडावर हि बातमी पोहोच केली. कि, संताजी घोरपड्यास कोणाकडून तरी हि बातमी समजली आहे तेव्हा हा संताजी सुमारे १० ते १५ हजाराची फौज घेऊन बहादूरगडाकडे रवाना झाला आहे. हि बातमी औरंगजेबास समजताच तो विचार करु लागला कि, हे मराठे काफर कोणत्याही क्षणी येतील व संभाजीस सोडवून नेतील, तेव्हा यावर काहीतरी उपाय करायलाच हवा, असे ध्यानी आणून त्याला आग्र्याची आठवण झाली आग्रा हा. माझा स्वत:चा किल्ला असताना दोघे काफर बापबेटे एवढ्या लांबून सुध्दा माझ्या कैदेतून निसटून गेले होते. हा बहादूर गड तर संभाजीचा मुलूख शिवाय हा किल्ला सपाट जमीनीवरचा गड मराठे किल्ला लढविण्यात एवढे तरबेज आहेत, प्रचंड डोंगरी किल्ले सुध्दा ते मोठ्या शिताफिने काबीज करतात. तेव्हा हा किल्ला ते मातीच्या ढेकळासारखा सपाट करुन मोठा हल्ला करुन संभाजीस सोडवून नेतील,

तशी औरंगजेबास त्याच्या गुप्तहेराकडून हि माहीती मिळाली, त्याने संभाजी राजास एका नजरकैदेत ठेवून, काही सल्लागाराची बोलणी सुरु केली व संभाजीस येथे ठेवल्याने काय धोका उत्पन्न होवू शकतो, हे सांगितले. त्यानुसार औरंगजेबाच्या प्रमुख सल्लागारामध्ये रायाराव नावाचा बहादूरगडचा ब्राम्हण किल्लेदार

होता तो मोठा चाणाक्ष, बुध्दीमान व कपटी स्वभावाचा होता त्याचे गांव पुण्याजवळ भिमा. इंद्रायणीच्या संगमावर असलेले तुळापूर हे छोटेसे खेडे होते. तो शिवाजीच्या स्वराज्य स्थापनेच्या काळात नेहमी विरोध करीत असे, विजापूरच्या अदिलशहाच्या दरबारात तो नेहमी आपले प्रस्थ टिकवून असे, परंतु औरंगजेबाने जेव्हा विजापूर काबीज केले तेव्हां तो औरंगजेबाच्या सैन्यात दाखल झालां. कारण विजापूर जिंकण्याच्या वेळेस त्याने औरंगजेबाला आतुन मदत केली होती. हे ध्यानात घेऊन त्याने औरंगजेबाने त्यास बहादूरगडावर खास सल्लागार, विश्वासू इसम म्हणून मदत केली होती, त्याची पुर्वीची हकिकत म्हणजे शहाजी राज्याच्या पुण्यावर मुरारजगदेवाने गाढवाचा नांगर फिरवला होता तेव्हा सुध्दा ह्या रायारावाचा बाप श्रीधर रायाराव हा त्यामध्ये सामील होता.

शहाजीराजे ज्यावेळी अहमदनगरची निजाम शाही सोडून विजापूरच्या आदिलशहाकडे जाण्यास निघाले, तेव्हा मुरारजगदेवाने त्याची मध्यस्थी म्हणून स्वत:, शहाजीराजास विजापूरकडे नेण्यासाठी तो आला. उभयतांची पुण्याजवळ खेड, येथे भेट झाली व ते विजापूरकडे निघाले असताना मुरारजगदेवाने शहाजीस एक गुप्त गोष्ट सांगितली, ती अशी कि, स्वत: मुरारजगदेवास एक महारोग त्यावेळी झालेला होता व त्याला त्या रोगाने फारच असहायता वाटत होती तेव्हा ह्या असल्या गुप्त रोगावर इलाज करणारा कोणी वैद्य ह्या भागात आहे काय? असे विचारल्यावर शहाजीस नागरगाव च्या भिमा इंद्रायणीच्या संगमावर ह्या व्याधीवर इलाज करणारा एक वैद्य असल्याचे माहित होते. तेव्हा त्यांनी नाग वंशियाचे गाव असलेले नागरगाव म्हणजे आजचे तुळापूर या ठिकाणी रुद्रनाथ नावाच्या एका प्रसिद्ध वैद्यासमोर मुरारजगदेवास घेऊन गेले.

रुद्रनाथ महाराज नावाच्या वैद्याने मुरारजगदेवाची तपासनी केल्यावर त्यांना काही दिवस उपचारासाठी आपल्याला येथे थांबावे लागेल असे सांगितले, त्यानुसार शेजारी असणाऱ्या मठात त्याची व शहाजीराजाची मुक्कामाची सोय करण्यात आली. सुमारे एकवीस दिवस उपचार केल्यानंतर मुरारजगदेवाचा हा



गुप्तरोग पुर्णपणे बरा झाला रोग बरा झाल्यावर मुरारजगदेवाने रुद्रनाथ नावाच्या वैद्य महाराजास दक्षिणा म्हणून काय देऊ, अशी विचारणा केली असता, शेजारी असलेले महादेवाचे मंदीर आपण दुरुस्त म्हणजे जिर्णोध्दार करुन द्या असे सुचविले, मुरारजगदेव हा विजापूरच्या अदिलशहाचा वजीर असल्याने त्याला कुठल्याही खर्चाची कमतरता नव्हती त्याने तावडतोब रोग बरा केल्याचे उपकार म्हणून तेथील नागरगावचे मोडकळीस आलेले संगमेश्वर महादेव मंदीर बांधून दिले.

आणि त्याचा विधी म्हणजे सांगता समारंभ करण्याचे ठरवून काही ब्राम्हण बोलावून घेतले. त्यांची नावे पुढील प्रमाणे

१) सोनभट देवगिरीस्त दरबार विजापूर

२) नरसिंहभट अग्नीहोत्री विजापूर

३) त्र्यंबकभट खेडकर नाशिक

४) भानभट तळेगावकर विजापूर

५) त्र्यंबकभट सुदामे काशी बनारस

६) महादेव भट्ट पुरंदरे पुणे (बाबासाहेब पुरंदऱ्याचे पुर्वज)

७) पुराणिक त्र्यंबकभट काशी बनारस

८) पुरुषोत्तम भट वैष्णव दरबार विजापूर

९) भानभट वैष्णव औंढ्या नागनाथ

१०) गौपतीभट ढेरे चिपळूण

११) अपदेवभट वित्राव पंढरपूरकर

१२) बाळपाठक पुरौहित नाशिक

१३) रंगनाथभट ग्रामजोतीशी पुणे रामदासी

१४) सोनभट ग्रामज्योतीशी वाई घाट

हे ब्राम्हण उपाध्ये आहेत

१५) पुंडलीक शास्त्री हरिदास वाई घाट

१६) त्र्यंबकभट नांदूरकर विजापूर

१७) रायाराव, रावरा, रायरीकर एकच नावाने विजापूर

१८) मोरेश्वरपंत वळे पुणे

१९) भानभट मरकळे स्थानिक, पुणे

२०) काशीपंत देवगिरीस्ते (मोकाशी) पुणे

२१) गजानन ब्रम्हे विजापूर कर

२२) महादेव भट पुराणिक (चावर) पुणे

२३) विष्णुपंत शास्त्री देव चिंचवड देवस्थान

२४) बाळभट नगरकट अहमदनगर ग्रामजोनीशी सनकाडे गुरुजी (हि सर्व नावे शिवचरित्र खंड ४ मध्ये व ९१ कलमी बखर मध्ये समाविष्ट आहेत दि. २३ सप्टेंबर १६३३ सुर्यग्रहण वारे सोमवार रोजी हा कार्यक्रम विधी पार पडला तेव्हा मुरारजगदेवाने नागवंशीय नाग लोकांची वस्ती असलेल्या या नागरगावचे संपुर्ण अधिकार ह्या ब्राम्हणांच्या हस्ते विधी करुन घेतली. व संपूर्ण नागरगावचे नामकरण तुळा-तुळापूर असे केले. हे सर्व ब्राम्हण व त्यांना राहण्यासाठी मोठ मोठे वाडे चोवीस भागात सरस - निरस हिश्शाप्रमाणे वाटून दिले. पुढे शिवाजी राजांचा स्वराज्य विस्तारणेच्या कार्यात सुध्दा हे लोक आदिलशहाकडेच त्याची मर्जी राखून होते. परंतु शिवरायांना उपद्रवं करण्यास खटाटोप मात्र त्यांनी चालूचं ठेवला होता. शिवाजी राजाच्या कारकिर्दीमध्ये वर क्र. १७ असलेला रायाराव नावाचा ब्राम्हण जावळीच्या चंद्रराव मोऱ्यांच्या पदरी कारकून म्हणून काम करत असे पुढे शिवाजीराजानी जावळी जिंकल्यानंतर तो विजापूर दरबारात आपले बस्तान बसविण्यासाठी रुजू झाला विजापूरवर जेव्हा नंतरच्या काळात म्हणजे शिवाजी राजाच्या निर्वाणानंतर औरंगजेब जेव्हा संभाजी राजावर चाल करुन आला तेव्हा याच रायारावने औरंगजेबाला विजापूर करा विरुध्द गुपचुपपणे मदत केली.



औरंगजेबाने जेव्हा विजापूरवर आपली सत्ता प्रस्थापित केली तेव्हा औरंगजेबाने या रायारावाची बुध्दीमत्ता पाहून त्याला आपले सल्लागार म्हणून नियुक्त करुन घेतले याच सुमारास संभाजीराजे पकडले जावून त्यांना बहादूर गडावर जेरबंद केले.

औरंगजेबाने सल्ला मसलतीसाठी जेव्हा इतर काही सल्लागार बोलविले त्यात रायारावाने दिलेला सल्ला औरंगजेबास एकदम पटला. तो असा, संभाजीराजे बहादूरगडावरचं कैद आहेत असे दाखवून, त्यांना जुने नागरगाव असलेल्या तुळापूर या गावी हलविण्यात यावे हलवताना त्यांना दहशत बसावी म्हणून त्यांची धिंड काढण्यात यावी म्हणजे तो आपण सांगेल तसं संभाजीराजा वागेल, म्हणजे स्वराज्याचे किल्ले आपल्या स्वाधीन करेल शिवाय औरंगजेब हा जातीने मुसलमान, तो संभाजीला नागरगावसारख्या म्हणजे तुळापूर या हिंदु धर्मस्थळावर कशाला घेऊन जाईल, म्हणजे मराठ्यांची फसगत होईल व बहादूर गडावर हल्ला करतील, तेव्हा आपले शिपाई त्यांचा तेथेच मुकाबला करतील, व आपल्याला संभाजीस तुळापूर येथे सर्व गोष्टी संभाजीकडून कबुल करुन घेता येतिल.

ह्या रायारावांच्या सल्याप्रमाणे संभाजी राजास एका घाणेरड्या उंटावर बसवून तुळापूरच्या दिशेने रवाना करण्यात आले उंटावर बसविल्याआधी वेडेवाकडे कपडे त्यांच्या अंगावर चढविण्यात आले. धिंड काढल्यानंतर हि ब्राम्हण मंडळी इतकी आनंदात होती, कि ती स्वत: नाचू लागली. तुळापूर येथे पोहोचल्यावर जेथे संगमेश्वर मंदिर बांधले होते. त्याच्या पिछाडीवर औरंगजेबाने आपला तळ ठोकला. कारण तेथे आता ब्राम्हणानी संभाजीराजाला आपल्या ताब्यात घेतले. एक प्रकारे त्यांना आता संभाजीराजांचा अनन्वीत छळ करण्यासाठी औरंगजेबाला प्रोत्साहित करावयाचे होते.

औरंगजेबाने प्रथम संभाजीसमोर एका तहाचा प्रस्ताव सादर केला, तो म्हणजे हे संभाजीराजा, तु इतका सामर्थ्यवान आहेस, कि माझ्या सारख्या जगजेत्या औरंगजेबालाही तु सुमारे ९ वर्षे यशस्वीपणे लढा दिला आहे, तुझ्या सारख्या सामर्थ्यशील मुलांची मला किव वाटते. तेव्हा तु सह्याद्रीच्या अंगावरचे सर्व

किल्ले मला परत दे, त्याच्या बदल्यात मी तुला उत्तरेकडील हवा तेवढा, मागशिल तेवढा, मुलुखं मी तुला देऊन टाकतो, अशा तहाचा प्रयत्न औरंगजेबाने संभाजीसमोर मांडला परंतु संभाजी राजानी बाणेदारपणे उत्तर देऊन हा तह कुठल्याही अटीवर मान्य नसल्याचे सांगून टाकले. नंतर औरंगजेबाने दुसऱ्या प्रयत्नात सह्याद्रीच्या अंगाखांद्यावरचे एर्नच्या सर्व गडकिल्ले म्हणजे स्वराज्याच्या खजिन्याच्या चाव्या व कोण कोण लोक माझ्या सैन्यातील तुला फितुर आहेत हे मला सांग नाहीत तर तुला ठार माराव लागेल परंतु संभाजीने औरंगजेबाचे हे हि म्हणणे धुडकावून लावले.

नंतर औरंगजेबाने एक विचार करण्यासाठी वेळ द्यावा. व एकाद्या गुपचुप ठिकाणी त्याला नजरकैदेत ठेवावे. हि कल्पना त्यांनी आपला विश्वासु रायाराव यांस सांगितली रायारावाने विचार केला कि, संभाजीस जर आज इतर ठिकाणी ठेवले आणि उद्या जर संभाजीने विचार करुन औरंगजेबाशी तह करुन आपली सुटका करुन घेतली तर आपले काही खरे नाही ह्या संभाजीस आपणच येथे आणले आहे हे सारे संभाजीरा पुर्णपणे समजले आहे.

तेव्हा त्यांनी औरंगजेबास भडकविण्यास सुरुवात केली, ह्याला येथेच सर्व काही कबुल करावयास लावा नाहीतर हा शिवाचा छावा आहे आपल्याला पुन्हा पश्चाताप करण्याची वेळ आल्याशिवाय राहणार नाही हि गोष्ट मात्र औरंगजेबाला विचार करायला लावणारी होती, कारण हे दोघेही पितापुत्र त्याच्या म्हणजे औरंगजेबाच्या आग्र्याच्या दरबारी घडली होती, तेव्हा जर मी या पितापुत्रास तेथे ठार मारले असते तर मला म्हातारपणी या मुलुखात आग्रा शहर सोडून यावे लागले नसते.

आणि म्हणून औरंगजेबाने संभाजीराजास तुळापुर येथे मंदिरा समोर उभे केले. आणि त्यास तेथे असणाऱ्या मंदीराच्या एका खांबास साखळदंडाने घट्ट स्वरुपात बांधले गेले त्याच्या सोबत कवि कलशालाही बांधले गेले आणि पुन्हा एकदा संभाजीराजांना स्वतः काही महत्वाचे प्रश्न विचारायला सुरुवात केली



औरंगजेब महाराष्ट्रात सुमारे आठ वर्षे झुंजला होता, परंतु तरीही संभाजीने एकाही युद्धात हार मानली नव्हती याची रणनिती काय होती ते मला सांगाव, असं औरंगजेबास वाटत होते म्हणून औरंगजेबाने संभाजीस विचारणा केली कि, अशी कोणती युद्ध शास्त्रातील कला तुझ्याकडे उपलब्ध आहे कि, माझी इतर सर्व राज्यात सत्ता असताना सुध्दा, माझ्या सारख्या जगजेत्याला सात लाख फौजेनिशी या महाराष्ट्राच्या मातीत तु सुमारे आठ वर्षे खेळवलेलस नंतर संभाजीस म्हणाला तु आता मला शरण ये आणि स्वराज्याचा सर्व कारभार व किल्ले आणि खजिना माझ्या स्वाधीन कर व माझे मांडलीकत्व पत्कर हे औरंगजेबाचे बोलणे संभाजीराजाने ऐकून घेतले व ऐकल्यानंतर म्हणाले कि औरंगजेब तुझ्या प्रश्नांना मी उत्तरे देतो परंतु माझ्या अंगावरचे हे साखंळदंड सोड, म्हणजे मी आपल्याशी बोलू शकेन.

त्यानुसार हशमाना आदेश करुन, औरंगजेबाने संभाजीच्या अंगावरचे साखळदंड सोडले आणि त्याच क्षणी संभाजीराजांनी औरंगजेबाच्या तख्ताकडे झेप घेतली (सध्या हा दगडी खांब व अंगावरचे कवडीमाळ, तुळापूर येथे पाहावयास मिळतात) आणि औरंगजेबाच्या तंगडीलाच हात घातला आणि औरंगजेबास खाली पाडले. कारण शंभुराजे म्हणजे वाघ समोरुन आला तरी त्याला टर टर फाडण्याची ताकद राजेंनी कमावली होती.

ताबडतोब औरंगजेब मोठ्याने अल्ला अल्ला असा ओरडला, औरंगजेबाच्या रखवालदारांनी लागलीच संभाजी राजांना जोरात मागे ओढून साखळदंडाने जेरबंद केले परंतु संभाजी राजाकडून झालेल्या प्रत्यक्ष हल्यामुळे औरंगजेब थरथर कापू लागला आणि त्याने शाही हुकूम काढून प्रचंड चिडलेल्या अवस्थेत संगमेश्वर मंदिराच्या डाव्या हाताला एक पोलादी खांब रोवण्याचा इशारा आपल्या हशमांना केला, पोलादी खांब तात्काळ रोवून झाल्यावर संभाजीला त्या खांबाला साखळं दंडाने घट्ट बांधण्यात आले. कवि कलशाला सुध्दा दुसरा मृत्यस्तंभ बांधण्यास सांगण्यात आला शिपायांनी दोन्ही मृत्युस्तंभ ताबडतोब तयार केले. दोघांनाही

नंतर रायारावांच्या म्हणजे ब्राम्हणांच्या सल्यानुसार सजा करण्याचा हुकूम औरंगजेबाने फर्मावला व त्यांना येथे उपस्थित राहण्याचा सल्ला देण्यात रायारावाने औरंगजेबास सांगितले कि, जहॉपनाह अब देर करने की कोई भी अवश्यकता नही बची है। अपनी कारवाई करने की तैयारी शुरु कर दो। हमने आपको जो सल्लाह दिया है, इसीकी तरहसे ये काफरोंका मृत्यु होनां चाहिए। मग ठरल्याप्रमाणे अत्यंत वेदनाकारक, म्हणजे डोळे तप्त सळईने काढणे, हाताच्या बोटाची नखे उपटणे, कानामध्ये उकळते सिसे ओतणे, त्यांची जीभ छाटणे, अंगावरची कातडी बोकड सोल्ल्याप्रमाणे काढणे व त्यावरं मिठाचे पाणी फेकणे इत्यादी प्रकारे संभाजीराजांचे चाललेले हाल पाहून तेथील तुळापूरकर ब्राम्हण मंडळी मात्र आनंदोत्सव साजरा करीत होती. संभाजीराजे मात्र वेदना सहन न झाल्यामुळे विव्हळत होते. चोवीस ब्राम्हणांनी मात्र हा प्रसंग चालू असताना औरंगजेबासमोर शतचटी कोटी यज्ञ आरंभण्यासाठी परवानगी मागीतली व संगमेश्वर मंदिरापुढे या यज्ञाचा आरंभ सुरु केला.

यज्ञात आहुती दिलेल्या तुपाचा आणि लाकडाचा धूर जेथे संभाजीराजांना व कवी कलशाला बांधण्यात आले होते त्या मृत्युच्या स्तंभापर्यंत जात होता याला जिवंत ठेवतां कामा नये. हा एक मग्रुर मराठा आहे याचे मनुस्मृर्ती मध्ये सांगितलेल्या कायद्याप्रमाणे हाल व्हायला पाहिजे.

याला लगेच मरण येणे म्हणजे पाप होईल, औरंगजेब मनुस्मृर्तीवाल्याच्या आहारी गेला होता, कारण औरंगजेबला तुळापूरला म्हणजेच सुरक्षित ठिकाणी आणण्याचा सल्ला तुळापूरच्या ब्राम्हणांनीच दिला होता. ठरल्याप्रमाणे औरंगजेबाने पुन्हा एकच प्रश्न विचारला, कि हे संभा आता तु बोलूही शकत नाही आणि ऐकूही शकत नाहीस फक्त खुनेनेच तो प्रश्न विचारला गेला परंतु काहीही प्रतिसाद न आल्यामुळे दुसऱ्या दिवशी म्हणजे १२ मार्च १६८९ रोजी हिंदू धर्मानुसार गुढी पाडवा म्हणून नववर्ष साजरे केले जाते या दिवशी घरोघरी भगवा ध्वज उभा केला जातो.



नवीन वर्ष मानले जाते. (शालीवाहन शकाप्रमाणे) याचीयाद मनात ठेवून तुळापूरकर ब्राम्हणांनी औरंगजेबाला आदेश केला कि, याला आज ताबडतोब संपवून टाका मग आदेशाप्रमाणे दोन गाझी फरशी व भाले घेऊन आले, व कवी कलशाचे व संभाजी राजांचे हातपाय एक एक करुन तोडण्यात आले एका हशमाने खडग्याचे धारदार पाते संभाजीराजांच्या मानेत घुसविले व हळूहळू मनुसमृतीतील संहीतेप्रमाणे व कुराणातील काही कायद्याद्वारे हाल हाल करित शिर धडावेगळे केले. अशा प्रकारे संभाजी राजांना मोगलांचा कर्दनकाळ ठरलेला शिवपुत्र भिमा – भामा इंद्रायणीच्या त्रिवेणी संगमावर मराठा साम्राज्याच्या रक्ताचा पाट, शंभुराजे अन् कवी कलशाच्या रक्तानी त्रिवेणी संगम लाल झाला.

नंतर लगेचच औरंगजेबाने तुळापूरकर ब्राम्हणाच्या सांगण्यावरुन एक फतवा जारी केला, कि संभाजीचे प्रेत हे जंगली स्वापदासाठी म्हणजे कोल्हे, कुत्रे, गिधाडे इ. प्राण्यांना खाण्यासाठी फेकून द्या, आणि त्याचे प्रेत जो कोणी उचलण्याचा प्रयत्न करेल त्याला ताबडतोब मृत्युदंड द्या असा आदेश जारी केला परंतु काही तेथील ब्राम्हण लोकांनी त्याचे मुंडके आमच्या स्वाधीन करा म्हणजे आम्ही उद्या गुढी पाडव्याच्या दिवशी त्याचे प्रेत भाल्याला टांगून भगव्या ध्वजाऐवजी नवी गुढीची पध्दत सुरु करु व त्याप्रमाणे त्यांनी दुसऱ्या दिवशी संभाजी राजांचे मुंडके, त्याला हिरवागार कडू लिंबाचा पाला खेटराची माळ, आणि साडी नेसवून तुळापुर गाव व आसपासच्या गावामध्ये हि मिरवणूक काढली ज्यांनी मिरवणूक काढली त्याचे नाव आहे रायाराव ह्या रायारावानेच गुढीची हि पालथा तांब्या, साडी, कडूनिंबाचा पाला ह्याची पध्दत संपुर्ण महाराष्ट्रात रुढ केली ती आजतागायत चालू आहे.

इकडे येसुबाई महाराणी यांच्या सांगण्यावरुन बहादूर गडाकडे निघालेले संताजी घोरपडयांनी बहादूरगडावर हल्ला केला परंतु संभाजीराजे तेथे नसल्याने ते निराश झाले गोविंद महाराचे व शिर्क्यांचे पथक या वेळी. चाकण परिसरात संभाजी राजांचा शोध घेत असतानांच त्यांना त्यांनी पाठविलेल्या एका हेरामार्फत

संभाजीराजांना तुळापूर येथे आणले असल्याचे माहिती मिळली गोविंदाने तुळापूरकडे निघण्याची तयारी शिर्के मंडळीना बरोबर घेऊन केली त्यांच्या सोबत फक्त १०० माणसाची तुकडी होती ते लपत छपत तुळापूरच्या आसपास म्हणजे पाबळ गावी आले असता त्यांना औरंगजेबाने संभाजीराजास ठार मारले.

असल्याची माहीती मिळाली हि माहीती मिळताच गोविंदाला एकदम गहिवरुन आले, त्याला राजांची सारखी सारखी आठवण येऊ लागली अशातच पाबळ माहेरवासीन असलेली जनाबाई नावाची एक स्त्री कि, जिने संभाजी राजाना मारल्यानंतर त्याच्या देहाचे तुकडे हाशमानी कोठे टाकले आहेत, ते तिने पाहिले होते. प्रेतांचे तुकडे करुन हाशम नदीपलीकडे वढु ब्रु।। गावच्या हद्दीत फेकत असताना ती तुळापूर येथील घाटावर कपडे धुण्याची गाठोडी घेऊन आली होती तिने हाशमांना पाहताच एका खडकाआड ती लपून बसली होती. तीला कोणीही मुलबाळ नव्हते ती लोकांची कपडे धुवून भांडी घासुन तिचा उदरनिर्वाह करित होती हे दृष्य पाहून तिने आपले माहेर असलेल्या पाबळ गावी जाण्यास निघाली असताना तिने गोविंदाच्या माणसाची बोलणी ऐकली व ति त्यांच्याजवळ जाऊन तिने प्रेताचे तुकडे करुन भिमा इंद्रायणीच्या संगमापलीकडे टाकले असल्याचे गोविंदास घाबरत घाबरतच सांगीतले तसा गोविंदाने तिला धिर दिला व आमच्या सोबत तु पुन्हा तुळापूरला चल व ती जागा लांबुनच दाखवं अस सांगितल्यावर तिला धिर आला, व गोविंद व इतर शिर्के मंडळी सोबत ती पुन्हा जंगलाच्या आडमार्गाने तिने लांबुनच ती जागा गोविंदास दाखविली त्या जागेकडे गोविंदाचे लक्ष गेले तेव्हा तिथे अनेक कुत्री, मोठमोठी गिधाडे, कावळे इतर पक्षी, प्राणी गोळा झालेले गोविंदाने पाहिले. तसा गोविंदाने हंबरडा फोडला, परंतु इथे एक गोष्ट वेगळीच घडली.

गावामध्ये जनाबाई नावाची स्त्रि बेपत्ता असल्याचे काही जणांनी रायाराव नावाच्या ब्राम्हणास सांगितली, रायारावास तिचा संशय आलेला होता तेव्हा नदीकिनारी तिने धुण्याचे गाठोडे तसेच टाकून दिले होते व ती पाबळला निघून



चालली होती परंतु तीने गोविंदास प्रेत फेकलेली जागा दाखविल्यावर ती पुन्हा तुळापुरात आपल्या राहत्या घरात आली असता. तिचा संशय आल्यामुळे तिला हशमाकडून ठार मरण्यात आले. आजही ह्या उपेक्षित स्त्रिचे वृंदावन भिमा इंद्रायणीच्या संगमावर उभे आहे कदाचित जर ह्या स्त्रिने संभाजीराजाचे प्रेत कुठे फेकले आहे हे जर पाहिले नसते. तर अनेक इतिहासकार मंडळीनी संभाजीस औरंगजेब दिल्लीला किंवा आग्रयाला घेऊन गेला व तिकडेच बेपत्ता केले, किंवा कैद केले असे लिहायलाही कमी केले नसते.

केवळ आणि केवळ जनाबाईच्या या कतृत्वाला सलाम करायला हवा, कि या महान स्त्रि मुळेच संभाजीराजांची हत्या झाली. व त्याचे प्रेत वढु गावच्या हद्दीत म्हणजे संगमापलीकडे फेकले गेले ह्याची माहीती मिळाली.

औरंगजेब संभाजी राजाची हत्या केल्यानंतर सुध्दा तुळापूर मध्ये तळ ठोकून उभा होता प्रत्यक्ष रायाराव नावाच्या ब्राम्हण वाड्यामध्येच त्यांची मुक्कामाची शाही व्यवस्था करण्यात आली होती त्या मुळे त्याची फौज भिमा कोरेगाव पासुन तुळापुरच्या संगमापर्यंत प्रचंड प्रमाणात पसरलेली होती.

गोविंदाने जागा हेरली परंतु औरंगजेबाचे सैन्य तेथून काही अंतरावरच होते. प्रेत तर उचलायचंच आणि राजांना अखेरची मानवंदना तर द्यायचीच म्हणून त्यांनी आपला वेश पलटी केला. फाटके, तुटके कपडे गोळा केले. इतर साथीदारानाही तशीच वेगवेगळी कपडे चढविण्यात आली त्यात शिर्के मंडळीही (गणोजी शिर्के सोडून) आघाडीवर होती गोविंदास एक चिंता भेडसाऊ लागली, ती म्हणजे आपण जर प्रेत उचलले आणि दिलेला अग्नी जर पेटला तर तो इतरांना दिसेल आणि आपण पकडले जाऊ, तेव्हा सावधगिरी म्हणून गोविंदाने वढु गावच्या एका विश्वासु महाराची रात्री जाऊन भेट घेतली, व आपला बेत त्यास सांगितला तोपर्यंत तिथे या प्रकाराची खबर सुध्दा कोणास माहीती झाली नव्हती मग दोघांनी एक बेत आखला तो असा कि,

नदिकीनारी जर आपण अग्नीडाग दिला तर तो कोणालाही माहीती पडू शकतो व आपण रचलेला डाव यशस्वी होणार नाही तेव्हा महार वाड्यात एक पडके छप्पर नसलेले घर त्यांनी हेरले व त्यांची पाहणी व्यवस्थित करुन घेतली तिथेच जनावरांच्या गोठ्यावर असलेले जनावरांनी खाऊन टाकलेली उष्टल म्हणजे उष्टे अन्न वैरण. त्या घरांच्या आजुबाजूला रचून पडक्या घराच्या चारही बाजून काही वाळलेली लाकडे जमा करुन ठेवली व जुनी पोती सुमारे १०,१५ दहां पंधरा मोकळी घेऊन ती संभाजीराजांचे प्रेत असलेल्या ठिकाणी आले त्या पोत्यात राजांच्या शरीराचे एकेक तुकडा टाकून ते पोते व्यवस्थित शिवले अशी रात्रीच्या वेळेस दहा बारा शिवलेली पोती घेऊन निघाले. ते निघाले असताना काही गस्तीवर असणाऱ्या पहारेकऱ्यांनी त्यांना हटकले तेव्हा गोविंदाने त्यास हा शेतमाल आहे आम्ही आमच्या शेतातून आमच्या घरी घेऊन चाललो असल्याचे शिताफिने सांगुन टाकले. आणि ती पोती त्या जुन्या पडक्या घरात म्हणजे महारवाड्यातील वढु बु. येथे गुपचुपपणे आणली ठरल्याप्रमाणे घरांच्या साईटच्या गोळा केलेला पाला पाचोळा इतर साथीदारांनी प्रेत येण्याआधीच पेटवून दिला होता तेथे झालेला धूराचा लोट पाहण्यासाठी पाहरेकरी आधीच येवून फक्त पाचोळाच पेटत आहे ह्याची खात्री करुन निघून गेले होते.

थोड्याच वेळात घरामध्ये रचलेल्या लाकडी सरणावर ती शिवून आणलेली पोती टाकून तेथे ताबडतोब अग्नी दिला गेला व गोविंद आणि त्याचे इतर साथीदार प्रेत जळेपर्यंत एका बाजूला जाऊन थांबले तशातच गोविंदाने नदीमध्ये स्नान करुन महाराजांना विधीप्रमाणे चितेला पाणीही पाजले व सर्वांनी मिळून संभाजी राजांना मुक अभिवादन केले. ज्या ज्या लोकांनी ते प्रेताचे तुकडे शिवले ते सर्व शिर्के होते त्यांनी त्या दिवसापासुन शिवले हे आडनाव धारण करुन टाकले आजही तुळापूर आणि वढु येथे शिवले कुटुंब बहुसंख्येने आहेत.

इकडे औरंगजेबाला एका हेराकडून खबर मिळाली, कि संभाजीराजांचे प्रेत कोणीतरी उचलून नेले तेव्हा त्याचा राग अनावर झाला प्रेत कुठे नेले, आसपासच्या



लोकांनी कुठे अग्नी दिला का याची चौकशी करण्याचे आदेश औरंगजेबाने आपल्या गुप्तहेरास दिले. परंतु तत्पुर्वीच गोविंदाचे व शिवले मंडळीने त्या जाळलेल्या प्रेतांच्या रक्षा एका पोत्यात भरुन व अस्थी एका कलशात भरुन गुपचुपपणे अज्ञात ठिकाणी नेऊन ठेवल्या ह्या औरंगजेबाच्या एकाही सरदारास किंवा हेरास हिजागा सापडली नाही इतके महान कार्य गोविंदाच्या हातून घडले.

शिवले मंडळीना येथेच ठेवून गोविंद महार हा गुपचुप आपल्या पाचाड गावी परत आला व त्याने रायगडावर महाराणी येसूबाईची भेट घेऊन झालेला सगळा प्रकार कथन केला. हे सगळा प्रकार ऐकून येसुबाई अतियश दु:खी कष्टी झाल्या परंतु येसुबाईंने गोविंदास केलेल्या धाडसाबद्दल जवळ करुन त्याचे अधिकार वाढविले व त्याचे आभार ही मानले.

संभाजी राजांचे प्रेत उचललेले समजताच औरंगजेब तुळापूर गावाचे नाव बदलून नरकापूर असे ठेवून तिथुनदुसऱ्या गावाच्या आसपास मृत जनावरे मेलेले सैनिक कुठेही माळरानावर फेकल्यामुळे तेथे हवा सुटल्यावर नरकासारखा घाण वास सुटत होता त्यामुळे त्याने आपली छावणी कोरेगाव येथे तात्पुरती हलविली.

संताजी घोरपड्यास बहादूरगडावर छापा टाकून सुध्दा संभाजीराजांची खबर न मिळाल्यामुळे तो निराश होऊन शोधाशोध करुन न इलाज झाल्यामुळे पुन्हा रायगड येथे परतला परंतु संताजीच्या मनातली धडपड काही कमी झाली नाही, याच सुमारास येसुबाईंनी गोविंदाने केलेल्या पराक्रमाची माहीती संताजीस सांगितली.

संताजीने मग गोविंद महारास जवळ बोलावून एक मोठाच डाव टाकण्याचे ठरविले या वेळी नेमका झुल्फीरखान नेमका रायगडावर चालून आला. संभाजी राजांच्या मृत्युनंतर स्वतःवर दु:खाचा डोंगर कोसळला असताना सुध्दा ह्या येसुबाईंनी मनावर दगड ठेवून स्वराज्य संरक्षण हेच जीवनातील उद्दीष्ट मानले ह्या तिच्या नितीधैर्याला सलाम करायला हवा.

मग येसुबाईनी रिकाम्या झालेल्या सिंहासनावर वारस नेमण्याची तयारी सुरु केली कारण ती काळाची गरज होती यावेळी येसुबाईचा मुलगा शाहु (शिवाजी) हा केवळ ८ वर्षाचा बालक होता राज सिंहासन रिकामे झाले असताना कोणत्याही स्त्रिने स्वत:च्या मुलाला गादीवर बसवून स्वत: राज्यकारभार पाहीला असता, परंतु छत्रपती संभाजी राजांनी प्रथम पासुनच त्यांना आपल्या अपरोक्ष राज्यकारभार पाहण्याची संधी उपलब्ध करुन दिली होती ते येसुबाईचा सल्लाही प्रमाण मानत असत. येसुबाईंना स्वराज्याचा राज्यकारभार पाहणे अवघड नव्हते.

तरीही या प्रसंगी त्यांनी अत्यंत धिरोदात्त पणे वागून निस्वार्थीपणाचा वेगळाच आदर्श घालून जगासमोर मांडला. आपल्या पुत्रास मंचकारोहन न करता. स्वत: पुढे होऊन राजाराम महाराजांना गादीवर बसवून निस्वार्थपणा दाखविला या त्यागामुळे सर्व स्वराज्य एकत्र होऊन औरंगजेबाविरुद्ध संघर्ष करण्यास सज्ञ झाले.

झुल्फीरखान त्या परिसरात तळ देऊन बसला असताना स्वराज्याच्या दृष्टीने येसुबाईंनी मोठे कठोर निर्णय घेण्याचे ठरविले, व राजाराम महाराजास स्वराज्याच्या गादीवर बसवून त्यांना तिथुन बाहेर जाऊन स्वराज्याची सुत्रे हलवावी. व स्वत: येथे रायगडावर राहूनच किल्ला लढवावा.

गोविंद महार, संताजी घोरपडे, धनाजी जाधव इत्यादी शुरवीर राजाराम महाराजा सोबतच गडावरुन बाहेर पडले व या दरम्यान राजाराम महाराज पन्हाळ्यावर गेल्यानंतर सेनापती संताजी घोरपडे, विठोजी चव्हाण, गोविंद महार यांनी औरंगजेबाच्या सैन्याची जागोजागी छापा घालवून दाणादण उडवून टाकली अाणि छापासत्र सुरुच ठेवले मोघल सैन्य भयभीत झाले संताजीची त्यांनी धास्तीच घेतली होती. कधी येईल, कुठुन येईल, याची मुघल सैनिक झोपेतसुध्दा काळजी करु लागले. अशाच वेळी संताजीने एक मोठे धाडसी सत्र चालवायचे म्हणून निवडक ५०० सैन्य घेऊन जेजुरीमार्गे श्री खंडोबाचे दर्शन घेऊन फुरसुंगी वरुन मांजरी वाघोली मार्गे नागरमल पाठीमागील कोल्हाचे बेट येथे लपून बसले आणि दरम्यान कोरेगाव येथुन औरंगजेब याचं दरम्यान पुन्हा तुळापुर येथे तळ देऊन बसला हि गोष्ट संताजीच्या दृष्टीने अजुनच चांगली झाली कारण गोविंद महाराने



अगोदर ह्या रस्त्याची व परिसराची पाहणी केली असल्यामुळे त्याला येथील आडवाटा माहिती पडल्या होत्या व औरंगजेब कोणत्या ठिकाणी आपला मुक्काम करतो हे हि माहीत होते त्यांच्या सोबत गोविंदाचा मेहुणा दामाजी जठार हाही एक शुर योध्दा संताजी बरोबर होता तानाजी मालूसरे यांनी सिंहगड काबीज केला त्यावेळेस दामाजी जठार हा लढवय्या सुध्दा त्यांच्याबरोबर होता.

सर्वांनी मुसलमानी पेहराव करुन आम्ही सिरके, मोहीते वगैरे कडील सरदार असुन औरंगजेबाच्या सांगणी वरुन टेहळणी करण्यासाठी थांबलो आहोत असे भासविले, शिवरायांनी शायिस्तेखानाला लाल महालात ज्या पध्दतीने छापा टाकला त्याच पध्दतीचा अवलंब करण्याचे ठरविले, रात्रीच्या वेळेला चार चार जणांचा ग्रुप करुन छावणीजवळ दाखल झाले दोन पहारेकऱ्यांना गोविंद महाराने जागेवरच गारद करुन टाकले व आत प्रवेश मिळविला हेराकडून मिळालेल्या माहितीनुसार ज्या ठिकाणी औरंगजेब माळ जपत बसला होता, त्याच ठिकाणावर हल्ला करण्याचे ठरले. तशा सुचनाही संताजीने गोविंदमहार व दामाजी महार (जठार) यास दिल्या होत्या.

रात्रीच्या अंधाराचा फायदा घेऊन अचानक हर हर महादेव) आणि शिवाजी महाराज की जय, अशी गर्जना करीत ५०० सैनिकांनी यामध्ये १०० लोक केवळ महार जातीचे होते छावणीवर थेट हल्ला चढविला परंतु औरंगजेबाचे नशिब बलवत्तर. तो सल्ला मसलत करण्यासाठी तंबुमधुन बाहेर पडला होता.

रण बहादूर विठोजी चव्हाण यांनी तंबुचा चांदतारा च कापून टाकला संताजीने तंबुच्या कनाती कापल्या आणि बहादूर गोविंद महाराने व दामाजी महाराने मात्र आपला मोर्चा तुळापूरातील असणाऱ्या ब्राम्हणाच्या वाड्याकडे वळविला. सर्व ब्राम्हणांचे वाडे जाळून भुईसपाट करुन टाकले कोणी सापडले त्यांना ठार मारले कुणास जखमी केले एकचं आगडोंब उसळून सर्वजण तेथुन सर्वजण गनिम गनिम अशा उलट्या बोंबा करुन तेथून निघून गेले.

# रायप्पा महार

छत्रपती संभाजी महाराज जेव्हा रायगडावर वास्तव्यास आले. त्यावेळी त्यांना अनेक मित्र भेटले गोविंद महाराबरोबर त्यांना दुसरा एक मित्र आवडला तो म्हणजे रायप्पा महार हा रायप्पा लहान पणापासुनच संभाजी राजांचा अत्यंत घनिष्ठ मित्र होता शिवाजी राजांच्या काळात जातीपातीला विशेष महत्व नसे. संभाजी राजे जेव्हा सकाळी सकाळी रायगडाखाली येऊन पाचाड वाडा येथे येऊन माँ साहेब जिजाऊची राहिलेली कामे म्हणजे मुलकी व्यवस्थेचा मुख्य कारभार जिजाऊ आऊसाहेब पाहात असत त्यातील काही कामे माँ साहेब संभाजी राजाकडून करवून घेत असत, व कामे आटोपल्यावर आपल्या संवगड्या बरोबर रायगडाच्या आसपास असणाऱ्या गावामध्ये घोड्यावर बसुन रपेट मारत असत. अशा वेळी रायगडाच्या पायथ्याशी असणाऱ्या सांदोशी गावामध्ये असणारा रायप्पा व संभाजी राजे यांची भेट झाली. सांदोशीचे आसपास भयंकर दाट झाडी असल्यामुळे तेथे जंगली जनावरांचा फारच सुळसुळाट झाला होता. अशा वेळी तेथील लोक गावाबाहेरच्या असणाऱ्या जंगलात जाण्यास घाबरत असत.

परंतु रायप्पा मात्र अत्यंत धाडसी स्वभावाचा मुलगा असल्यामुळे तो या जंगलात कशालाही न घाबरता जंगलात शिकारीला जात असे. अशाच एका प्रसंगी संभाजीराजे, ज्योत्याजी केसरकर व इत्यादी घोडेस्वार शिकारीला गेले असताना, त्यांना रायप्पा एकटाच जंगलात शिकारीला जाळे लावून बसला असल्याचे त्यांना दिसले. संभाजी राजे व त्याचे साथीदार घोड्यावरुन खाली उतरले, हे पाहून रायप्पाने झाडावरुन राजाना हाक मारली व झाडावरुन खाली उतरला. व राजांस प्रणाम केला. तेव्हा राजांनी त्यास एकटा दुकटा जंगलात फिरु नकोस, कारण



शिकार करताना एखादा हिस्त्र पशुजर समोरुन आला तर आपलीच शिकार होऊ शकते, असे राजांनी सांगितल्यावर रायप्पास ते बरोबर पटले मग त्यांनी रायप्पास रायगडावर घेऊन आले. व त्यास फक्त आपल्याबरोबरचा साथीदार व अंगरक्षक बनवून घेतले यानंतर त्यांचा काही काळ दररोज शिकारीला जाण्याचा छंद काही सुटला नाही, ते दोघे अशाच एका दिवशी सांदोशीच्या वरच्या जंगलात शिकार त्यांना मिळाली नाही, म्हणून त्यांनी सोबत आणलेली भाकरी सोडून दोघांनिही एकत्र बसुन खाल्ली आणि थोडा वेळ आराम करुन आपण पुन्हा शिकार शोधू असे बोलून एका मोठ्या झाडाखाली निवांत गप्पा मारत बसले.

परंतु संभाजीराजे व रायप्पा महार ज्या झाडाखाली बसले होते त्या झाडाच्या बुंध्याला करवंदीची खुप मोठी जाळी होती. त्याच करवंदीच्या जाळीमध्ये मोठा पट्टेदार जंगली वाघ, सुध्दा निवांत आडवा पडून आराम करीत होता. संभाजीराजे व रायप्पा आपल्या गप्पात दंग असताना त्या वाघाने ह्या दोघांना पाहिले वाघाने अत्यंत सावध होऊन जाळीतून हळूहळू आवाज न करता बाहेर आला. आणि वेगाने त्यांनी संभाजीराजावर झेप घेतली तसे संभाजीराजे धाडकन जमीनीवर आडवे झाले. संभाजी राजे जमीनीवर झोपल्यामुळे वाघाची राजावरची झेप चुकली आणि वाघ एकदम पुढे झेपावला तसे संभाजीराजे ताडकन उठून उभे राहिले. वाघ एकदम पुन्हा मागे वळून संभाजी राजावर चालून आला परंतु अतिसावध झालेल्या संभाजीराजांनी वाघाचा जबडाच हातात पकडला तसा रायप्पाने अत्यंत चपळाईने वाघावर मागून तलवारीचा वार केला संभाजीराजांनी वाघाचा जबडा एकदम उचकटून आपल्या ताकतीने फाडला व वाघ अर्धमेला झाला रायप्पाने दाखविलेल्या ह्या अत्यंत धाडसानेच शंभुराजांचे प्राण वाचले त्या दिवसापासुन रायप्पाला शंभुराजांनी आपले अंगरक्षक बनविले मारलेल्या वाघाला घेऊन शंभुराजे आणि रायप्पा पाचाड येथे आले. हि वार्ता वेगाने रायगडावर पसरली शिवाजीराजे व जिजाऊ माँ साहेबांनी रायप्पाला बोलावून घेतले व त्याचे कौतुक करुन त्याला एक सोन्याचा कडा महाराजांनी भेट म्हणून दिला.

रायप्पा व संभाजीराजांनी आसपासच्या म्हणजे रायगडाच्या परिसरातील शेतकऱ्यांना उपद्रव देणाऱ्या अनेक वाघांचा यानंतर बंदोबस्त केला त्यामुळे रयतेने त्यांना व राजांना या केलेल्या चांगल्या कामाबद्दल त्याचे मनापासून कौतुक केले.

यानंतर नेहमीच कोणत्या ना कामगिरी सोबत रायप्पा महार नेहमी संभाजीराजां सोबतच असे. पुढे रायप्पाला संभाजी राजांनी पारगड किल्ल्यावर तेथील किल्लेदाराच्या मदतीसाठी नेमणूक केली. त्यामुळे काही काळ संभाजीराजे व रायप्पा महार एकमेकांपासून बराच काळ दूर राहिले. स्वराज्याच्या जोखमेची कामे असल्यामुळे सर्वांनाच आपल्या बरोबर ठेवणे जमत नसे कारण प्रत्येक ठिकाणी विश्वासू व इमानदार माणसाची स्वराज्याला गरज पडत होती, त्याप्रमाणे थोरल्या महाराजांनी चालविलेले कार्यचं संभाजीराजांनी पुढे चालू ठेवले असल्याचे इतिहास वाचल्यावर जाणवत राहते पुढे रायप्पाने आपल्या हुशारीने मर्दुमकीने तेथेही स्वराज्याची सेवा अविरत इमानदारीने पार पाडली परंतु बऱ्याच काळानंतर आपल्या प्राणाहून प्रिय असणाऱ्या बालमित्राला दुश्मनाने पकडून नेले आहे हि वार्ता जेव्हा रायप्पाला समजली तेव्हा मात्र रायप्पा पार हादरुन गेला प्राण गेला. तरी चालेल, रायामामा, पण हा खलिता आपल्या राजापर्यंत पोहोच कर महाराणी येसुबाईने हे काम रायप्पावर सोपविले, याचा अर्थ महार समाज किती इमानदारीने आणि तत्परतेने स्वराज्याच्या कामी उभा राहिला आहे हे लक्षात घेण्याजोगे आहे.

रायप्पाला आता ते काम तातडीने करायचे होते शंभुराजासोबत झालेला घात त्यांला झोप येवु देत नव्हता, त्याने आपल्या घरी जाऊन देवप्पा या आपल्या भावास सोबतीला घेतले व रातोरात घोड्यावरून धावत पंढरपूर मुलूखाकडे निघाला. वाटेत तपास करित त्यांनी बहादूरगडाचा मार्ग धरला पण प्रत्यक्ष त्या भिमा नदीच्या खोऱ्यातली परिस्थिती पाहून ते दोघेही पुर्णपणे गळगटून गेले. कारण आजुबाजूची गावे भितीने परांगदा झालेली होती जागा ओस पडल्या होत्या. घरांना कुलूपे आणि दारात काटेरी शीरी ठोकून रयतेने गावे रिकामी केली होती. कुठेतरी



फक्त मोकाट कुत्री आढळायची गावेच्या गावे स्मशानासारखी वाटत होती. क्वचीत काही लोक शेताबांधाच्या ओढ्या ओघळीच्या आडोश्याने लपून राहत होते.

काहीही असले तरी रायप्पाला बहादूर गडावर पोहोचायचेच होते, त्या परिसरातुन घोडा चालला असताना, त्यांची एका भिस्तवाल्या पथकाची गाठ पडली ते चामड्याच्या पिशव्यातुन पाणी घेऊन जायचे फौजेच्या स्वारांना पाणी नेऊन द्यायचे त्याचे काम असायचे हाच त्यांचा मुख्य धंदा उद्योग होता. त्यांनी एका त्यातील स्वाराकडून एक चामड्याची पिशवी किंवा दंडकी असे तिला म्हणायचे ती मिळविली. यामुळे काळा रंग दख्खनी भिस्ती पथकामध्ये रायप्पा महार व देवप्पा महार हे दोघे बंधू त्याच्यामध्ये मिसळून गेले.

रायप्पा खबर काढायचा प्रयत्न करित होता. मात्र दहशतीमुळे कोणीच काहीही बोलायला तयार नव्हते भावना विवश होऊन रायप्पाला रात्री बेरात्री शंभुराजांची आठवण येई, काळ नदीच्या खोऱ्यात आणि निजापूरच्या डोंगर कपारित राजासमवेत केलेल्या शिकारी आठवंत, तोंडात मुंडाशाचा बोळा घालून तो हुंदके देई त्याची ती अवस्था पाहून देवप्पाने त्याच्याकडची येसुबाईंनी पाठविलेली चिठ्ठी काढून घेतली. आणि आपल्या कनुवटीला व्यवस्थीत पणे बांधून ठेवली. धिंडीच्या त्या दिवशी भिस्तीच्या त्या मुखियाला फौजदाराचा निरोप आला कि कोणीतरी बडे राजबंदी घेऊन पथके आज बहादूरगडात प्रवेश करणार आहेत. तेव्हा त्यांना जे पथक पाणी पुरविणारे होते त्यांनी आत जावे. त्याच पथकात रायप्पा सामील झाला तेच पथक आत किल्ल्यात जाणार होते. नेमका हाच आनंद या दोघा महार बंधूना झाला.

दुपारी होत चालली ऊन वाढू लागले पाण्याची तलफ वाढू लागली. तशी फौजेकडून पाण्याची मागणी करण्यात आली आजुबाजूला रेड्याचे गाडे लावले होते त्या गाड्यात कातड्यांच्या मोठ्या पखाली ठेवल्या होत्या त्यातुन भिस्ती चामड्यांच्या पिशव्यातुन भरुन पळू पळू पाणी आणत होते. व तहानलेल्या फौजांना

ते पाणी पुरवीत होते औरंगजेब बादशहाच्या हुकूमानुसार मुकरबाखानाच्या स्वागतासाठी त्याचे सारे नामचंद सरदार गावाबाहेरच्या माळरानावर जमा झाले होते. तंबुरताशे, शहादाणे, मोठ मोठ्याने वाजत होती तोवर हि नेमकी कोणाची धिंड आहे याचा रायप्पाला पत्ता लागत नव्हता तो पाणी पोहोच करण्यासाठी आत किल्ल्यामध्ये घुसण्यासाठी पुढे चालला होता.

तोच शंभुराजांच्या अंगावरिल साखळदंड खळखळ वाजले, समोर दोन घाणेरडे, मरतुकडे उंट उभे होते. त्या उघड्या बोडक्या उंटाच्या पाठीवर बसण्यासाठी कसलिही सामानाची सोय नव्हती की जीन सामान नव्हते, तेवढ्यात पाच सहा इसमांनी दंड बेड्यासकट राजांना आचुता देऊन उचलले व उंटावर बसविले राजांची चमकदार नजर इकडे तिकडे फिरत होती समोर हजारो फौजेच्या हातामध्ये नंग्या तलवारी दिसत होत्या रस्त्यामध्ये दुतर्फा आ वासुन बघणाऱ्या तोफांच्या रांगाच्या रांगा सज्ज करुन ठेवलेल्या होत्या तोफदलाच्या मागे काळ्याकभिन्न चेहऱ्याचे तेलकट रंगाचे गोलदाज उभे केले होते. त्या दुष्टनगरी मध्ये राजांच्या धिंडीची नव्हे तर, जाहीर विटंबनेची जोरदार तयारी चालली होती.

समोरच्या बाजूने लष्कराच्या रांगेतुन धिंड पुढे सरकणार होती. सागरातुन आणखी प्रवाह वहावेत, तशी धिंड माणसांनी, बघणाऱ्यांनी फुललेल्या गावातून, फौजा बाजारातून पुढे निघणार होती. तिच्या संरक्षणाची जबाबदारी बहादूरगडाचा ठाणेदार महादजी निंबाळकर, व तुळापूरचा रायाराव यांच्यावर सोपविली होती. मुद्दाम शिवाजी राजांचा जावई आणि संभाजी चा मेहूणा म्हणून महादजीवर औरंगजेबाने जाणीव पुर्वक जोखीम सोपविली गेली होती. जर महादजीने यात कसुर केली तर दुसरा इमानी सेवक म्हणून रायाराव हा तुळापूर गावचा सुभेदार त्याच्या वर लक्ष ठेवून होता. हा जातीने ब्राम्हण असल्यामुळे तो आपले काम चोखपणे करणार हे औरंगजेबाला पुर्णपणे माहिती होते. तो बेहड्याची व्यवस्था लावत मागे पुढे फिरुन सर्व ठिकाणी लक्ष देऊन होता. परंतु संभाजी राजाकडे नजर द्यायचे



पुर्णपणे टाळत होता.

उघड्या उंटावर बसलेल्या शंभुराजांना रस्सीदोऱ्यानी आणि साखळदंडानी जाम बांधले गेले होते. एक रजपूत सरदार अमरसिंग हे काम स्वत: जातीने लक्षपुर्वक पाहत होता. राजांनी गेले कित्येक दिवस बंद मेण्यातुन बाहेरचा उजेडच पाहिलां नव्हता गेल्या कित्येक दिवसात त्यांचे ना हात मोकळे ना त्यांना नीट श्वास घेता आला होता. कोणाशी वार्ता करण्याचा अगर बोलण्याचा प्रश्नच येत नव्हता. परिस्थितीने त्यांना मुके बनविले होते. आपल्या अंगाभोवती दोर बांधणाऱ्या लांब निमुळत्या दाढीतल्या अमर सिंगाकडे राजांनी पाहिले. त्यांनी त्याचा पटकन हात धरला व ते गहीवरुन बोवले.

तु तु जातीचा रजपूत आहेस, आमच्या दुर्गादासाच्या मुलूखातला.

जी हाँ । तो हुंकारला.

दोस्ता तुला तुझ्या देवताची आण. खुप झाली विटंबना मुक्त कर आम्हाला या बदनामीतुन, या यातनामधून.

लेकिन । शाही हुकूम राजे–

बंधु, एक आमचा माणूस म्हणून तुला रक्ताची शपथ घालतो. शिवाजीच्या या बछड्याला हे असं कुत्र्याच्या मौतीन मरन द्यावं, हे शोभुन दिसते का या राजपुताच्या रक्ताला?

चल दोस्ता कर एक एहसास कर – कळवळून संभाजीराजे बोलले काय करु राजे ?

पटकन उचल ती तुझी तलवार, कर झटकन आमची खांडोळी – नको रे थांबूस बंधू ।

अमरसिंगला गहिवर आला त्याने शंभुराजांच्या डोळ्यात तरारुण आलेले अश्रु पाहिले. तसा त्याचा हात झटकन आपल्या म्यानावर पडला. तो तलवार उपसु

लागला, तोच त्यांच्या हातावर दुसऱ्या कुणाचा तरी राकट पंजा पडला आणि ती घटना होणारी तिथेच थांबवली गेली. शेजारी घुबडा सारख्या तोंडाचा इखलासखान उभा होता. क्यु सरदार क्या इरादा है? त्याने विचारले. खरे तर अमरसिंगाला राजांची दया आली होती. परंतु मुक्ती देण्याची एक अंधुक आशा इथे संपून गेली.

विटंबनेला आणि मानहानीला दर्जाच राहिला नव्हता, ज्या राजांच्या अंगावर सर्वात महागडे आणि कलाकुसरीचे आपल्या हातचे दागिणे आणि अंगरखे चढावेत म्हणून सुरतेपासून पणजी पर्यंत दर्जी झुरायचे त्या शंभुराजाची, आणि कविची वस्त्रे भर रस्त्यात उतरवली गेली. त्यांच्या अंगावर विदुषकाचे चट्यापट्याचे झगे चढविले गेले. ज्याच्या गळ्यामध्ये हिऱ्या माणक्याचे रत्नहार चमकत असत, त्यांच्या गळ्यात गुरांच्याही मानेला जाचेल, काश्याच्या घंट्या बांधल्या होत्या. त्या दोघाच्याही डोक्यावर अट्टल गुन्हेगारांच्या डोक्यावर जशा इराणमध्ये लाकडी टोप्या ठेवल्या जातात. तशाच तख्तेकुलाह म्हणजे लाकडी फळ्यांचा लांबच लांब टोप्या ठेवल्या गेल्या. त्यावर अनेक छोटी छोटी निशाणे लावली गेली होती.

बारीक बारीक घुंगरु बांधले गेले होते. काही हशम ते दोन्ही उंट धरुन पुढे चालत होते. ताशे, तुताऱ्या मोठमोठ्या आवाजात पुढे पुढे चालत होत्या राजांना, कवी कलशाला उंटावर उलटे बसविण्यात आले होते. त्यांना त्या जनावराशी करकचून बांधले होते संभाजी राजांना आपले हात उंच करायला लावून त्या भोकाची एक फळी आडवी अडकवली होती फळीमध्ये दोन्ही हात अडकविलेले होते त्या दोघांच्या मानाही लाकडी खोड्यात अडकविल्या गेल्या होत्या त्यामुळे त्यांना त्यांच्या माना इकडे तिकडे वळविण्यास येत नव्हत्या.

एके काळच्या रायगडाच्या राजेश्वराला करोडो होन असलेल्या धन्याला बत्तीस मनाच्या सोन्याने बनविलेल्या सिंहासनावर बसणाऱ्या मराठ्यांच्या छत्रपतीला आणि त्यांच्या मुख्य प्रधानाला दोघांनाही घाणेरड्या उंटावर बसविले गेले होते मिरवणूकीत सर्वात पुढे ठाणे अमलदार महादजी चालत होता.



आता नंपुसकानाही भलताच जोर चढला होता, हशम मुद्दाम खोडसाळपणे उंट पळवत होते पळता पळता मध्येच त्यांना गरकन् वळविले जात होते ती उंच पाठीची जनावरे गरकन् फिरली कि कैद्याचे झोक जात होते अंगाला बांधलेल्या साखळ्या व दोर एकदम काचत असत राजांच्या डोळ्यापुढे एकदम चांदण्या चमकत असत. मध्येच भुवळ आल्यासारखे होई. ते एका बाजूस कोसळत, कलडंत असत. त्या मुक्या जनावरांची सुध्दा दमछाक होत होती. वारंवार बसणारे हादरे दचके आणि हिसक्यांनी राजांच्या शरिराला अनंत वेदना होत होत्या.

अशातच रायप्पा महार पाण्याच्या पिशव्या पुरवत पुढे चालला होता जमावातून कोणीतरी मरगठ्ठे दो कैदी, असे अस्पष्ट शब्द कानावर पडल्याने रायप्पा थरथरारुन गेला तो तसाच गर्दीतून वाट काढीत पाणी पुरविण्याचे नाटक करीत उंटापाठोपाठ सपाट्याने चालत सुटला. त्याने वळणावर संभाजी राजास बघितले. राजांचे अतिशय चमकदार डोळे त्याने पाहिले. नजरानजर झाली. संभाजीराजे उदासवाणे हसले, असेल? कदाचित कोणीतरी रायप्पा सारखी दिसणारी दुसरी पाणी वाटणारी व्यक्ती झाले.

धिंड पुढे पुढे चालली होती नासमज रांडापोरे हि धिंड पाहात होती आपल्या राजांची चाललेली हि माकड चेष्टा पाहून इमानी रायप्पाचे काळीज आजुन तुटत होते रायप्पाला एकदम आज विस्फारुन आले. राज्यभिषेकावेळची ती जंगी मिरवणूक आठवली, त्यावेळी राजांनी घातलेली अंबररखा रत्नमोत्यांचे अलंकार आठवले आणि रायप्पा चिंतातूर झाला. त्या धिंडीत पहारा देणारे मोगल शिपाईही मनातून तसे दबकून होते घाणेरड्या मरतुकड्या उंटावर बांधलेला हा माणूस संभाजीराजा आहे, हे चांगले माहीत असुनही त्यांचाच ह्या गोष्टीवर विश्वास बसत नव्हता!.

त्यांच्यापैकी अनेक जणांनी गेल्या सुमारे आठ वर्षात बुऱ्हाणपूर, सोलापूर, गोवा, चेऊल, कल्याण, आणि कुठल्या ना कुठल्या भागात डोंगरदऱ्यांत, कड्याकपारीत शंभुराज्यांच्या सैन्याशी लढताना संभाजी राजे मनात आठवले होते. संभाजी राजाची तेव्हाची ती दहशत, तो दबदबा त्यांनी उडविलेल्या त्या मोगलांच्या

झोपा, या साऱ्यांचा त्यांना विसरही पडला नव्हता.

थिंड बहादूरगडाच्या तोंडावर येत होती रायप्पा राजांच्या जखमी, वेदनामय शरिराकडे पुन्हा पुन्हा पाहत होता रायप्पाने ऐन १० वर्षे वय असताना संभाजी राजासोबत अचानक उठलेल्या वाघाला राजाच्या साथीने ठार मारले होते. हे दृश्य पाहताना मात्र त्याचे मन स्थिरावत नव्हते. आज नराधमाच्या मेळ्यामध्ये आपल्या मित्राची राजाची बुडती नौका रायप्पा उघड्या डोळ्यांनी पहात होता. त्याचे डोळे हे दृष्य पाहण्याची इच्छा व्यक्त करत नव्हते. थिंड एकदाची बहादूरगडाच्या दरवाजापाशी पोहोचली समोरचा महादरवाजा उघडला गेला. आता हिच संधी राजासाठी काहीतरी करण्याची होती आणि रायप्पाने देवजीस खुण केली त्याचे रक्त उसळून आले कानशिले गरम होऊ लागली मनगटे करकचून वळली, राग एकदम अनावर झाला धमण्या पेटल्या काय होतेय, ते कळण्याआधीच त्याने जोरात मागे वळून एका मुघल शिपायांच्या हातातली तलवार खसकन् हिसकावून घेतली. आणि काय होतय, ते कळायच्या आतच उंटाभोवती चाललेल्या सहा हाशमांची मुंडकी उडवून दिली आणि राजे शंभुराजे अशी मोठ्याने आरोळी ठोकून दोघेही बंधु उंटावर चढून संभाजी राजांच्या अंगावरचे दोर कापले व साखळदंड सोडण्यास सुरुवात केली.

इतक्यात संभा का आदमी ! गनिम असा मोगलांनी गल्का केला उंटावरील साखळदंड सोडणाऱ्या रायप्पाला मारण्यासाठी असंख्य तलवारी पुढे आल्या रायप्पाचे मस्तक त्याचे पोलादी दंड, पाठ सर्वत्र सपासंप वार झाले रक्तांची कारंजी उडाली क्षणार्धात रायाप्पाच्या शरिराचे असंख्य तुकडे झाले मोगलांच्या मग्रुरीला ह्या प्रकाराचे काहीच वाटले नाही रस्त्यात पडलेल्या रायप्पा महाराच्या शरिराचे तुकडे तुडवत तुडवत ती थिंड तशीच पुढे चालत राहिली.

हे शंभुराज्याच्या पुर्णपणे आता लक्षात आले होते. रायप्पाच्या गरम रक्ताची चळक राजांच्या मांडीवर सांडली होती. खऱ्या शिवाजीराजाला, संभाजी राजाला आणि त्यांच्या स्वराज्याला घडविणाऱ्या कष्टकरी, श्रमिक इमानदार धाडसी रक्ताने केलेला हा अखेरचा मुजरा होता.



ह्या सर्व गोरगरिब कष्टकऱ्यांची सवय शंभु राजांना झाली होती त्याचे काळीज कृतज्ञतेच्या भावाने भारावून गेले. अशा ह्या महापराक्रमी महार विराची जेथे हत्या झाली त्या बहादूरगडाशेजारी त्याची साधी समाधी अगर माहीतीही नसावी हेच आपले दुर्दैव होय.

म्हणूनच म्हणावेसे वाटते.

अनाम विरा जिथे जाहला ।

तुझा जिवनान्त ।

स्तंभ तिथेना कुणी बांधला ।

पेटली ना वात ।

बहादूर गडावर रायप्पाची समाधी बांधली असताना पेशवे काळात ती समाधी दुसऱ्याचं समाधीच्या रुपात दाखविली जाते, हे विशेष.



# सर्जा महार

रायगडाच्या पायथ्याजवळचे अजुन एक छोटेसे गाव आहे त्या गावाचं नाव आहे कडसरी त्या गावामध्ये सर्जा आणि राधा हि अत्यंत गरिब घरातील कुंटुब राहात होते. गायथळाच्या वाकापासुन ते सोलून त्याचे वेगवेगळे दोर याच काळामध्ये बनविले जायचे ते काम हे दोघे नवरा बायको मिळून करत असत वेगवेगळे दोरखंड बनविण्याचा त्यांचा वडीलार्जीत धंदा आसायचा त्या काळामध्ये घोड्यांना बांधण्यासाठी जनावरांना बांधण्यासाठी ह्या दोरखंडाचा उपयोग होत असे. ते हिंडून फिरुन वेगवेगळ्या गावामध्ये जाऊन दोर विकून चार पैसे मिळवत असत व आपल्या कुटूंबाचा उदर निर्वाह करीत असत. त्या संपुर्ण गावात फक्त २० ते २५ घरे होती त्यात एका छोट्याश्या कारवीच्या घरात राधा आणि सर्जा हे दोघे राहत होते.

त्यांचं दोघाचंही दोर बळायचं काम चालू असताना कसलिशी तरी दवंडी वाजल्याचा आवाज त्यांच्या कानावर आला. तेव्हा राधेन सर्जाला दवंडी विषयी माहीती सांगितली कि धनी । अवं ऐकलस का दवंडी वाजतीया... चला बघू तरी काय हाय दवंडी.

चल चल अस म्हणून दोघेही जवळच्या पारावर धावली. पारावर उभा असणारा दवंडीवाला दवंडी वाजवून सांगत होता, ऐकाहो, ऐका! येत्या आमावस्येच्या रात्री रायरी गडाभोवती बसियलेल्या चौक्यातील चौकीदाराच्या नजरा चुकवून फकस्त खडा (उभा) सरळकडा चढून जो कोणी बहाद्दूर वीर गडावर जाईल, व गडावर भगवे निशाणा जाऊन फडकवेन त्याला शिवाजी महाराजांच्या



कडून एक हजार होन रक्कम व एक गाव इनाम म्हणून मिळणार हायेत हो डडड

हि दवंडी ऐकून सर्जा महाराच दंड स्फुरण पावू लागले. सर्जा.. तरणाबांड भरदार छातीचा आणि पिळदार अंगाचा रांगडा गडी होता तो राधेला म्हणाला राधे ! जाऊ कागं ह्या कडा चढून काय वाटत तुला हे काम जमन कागं मला ?

अव धनी या रायरीच्या किल्ल्याच्या खड्याकपारीस लई अवघड कड तुम्ही सहज चढुल गेला हायसा, मग हे तर काय राधेचा मिळालेला धिर पाहून तिचं अर्धवटचं बोलणे ऐकून सर्जा तिला म्हणाला मी जर जिंकलो तर एक हजार होन अन् एक गावची मालकीन होणार आहेस राधे तु .

राधेने सर्जास जाण्यासाठी प्रोत्साहित केलं आणि कडा चढून वर जाचं असं सांगुन टाकलं ! .

पुढे आलेला सर्जा जमलेल्या लोकांमधून पुढे येत म्हणाला अहो दवंडीवाले दादा! जा आण सांगा आपल्या शिवाजीराजाला म्हणावं कडसरी गावचा हा सर्जा महार हा इनाम जिंकणार अमावश्येच्या रात्रीच ह्या उभ्या कातळातून मी गडावर येणार .

सर्जाचे बोलणे ऐकून तो दवंडीवालाच नाही तर तिथ दवंडी ऐकण्यासाठी ती जमा झालेली माणस चक्रावून गेली. बाया बापड्यानी तर तोंडातच बोटे घातली.

तिथे जमलेल्या जुन्या म्हताऱ्या बायांनी तर त्याला खडसावून सांगितले कि नको ये पोरा । कशाला आपल्या मयतीला आमंत्रण देतोस. असा पण समजविण्याचा प्रयत्न केला परंतु सर्जानं ठाम निश्चय केला., तो हे आव्हान स्विकारायला तयार झाला. त्यांनी कुणाचेच काहीही ऐकले नाही कारण त्याच्या बायकोची म्हणजे राधेची त्याला पुर्ण प्रेरणा मिळाली होती. आणि त्याचाही आत्मविश्वास दांडगा होता दररोज त्या रानावनात जाऊन लाकुडफाटा, मध गोळा करणे अवघड डोंगराचा कडा चढणे यात तो बालपणापासुन पटाईत होता. त्याचा आत्मविश्वास इतका दांडगा होता कि, तो दवंडी सांगणारा माणूस आपला हा

निरोप शिवाजी राजांना देईल कि नाही, याची सुध्दा वाट त्याने पाहिली नाही.

दुसऱ्या दिवशी चित्तदरवातून तो स्वतःच रायगडावर गेला व त्याने शिवाजी राजांची भेट घेतली आणि राजांना म्हणाला राजे..... मी सर्जा महार.... या रायगडाखाली असलेल्या कडसरी गावचा एक मर्द, आहे तुम्ही दिलेल्या दवंडीमुळे मी सर्जा महार येत्या आमावशेच्या रात्री कडा चढून येणार आणि गडावर निशाण रोवणार अन् इनाम घेऊनच जाणार...

सर्जाच्या प्रत्येक शब्दातुन त्याचा आत्मविश्वास प्रगट आणि प्रबळ होता. शिवाजी महाराज हे जसे पराक्रमी होते. निधड्या छातीचे होते, गुणवंत होते, तसेच ते अचूक नररत्न पारखीपण होते. त्यांना माणसांची उत्तम पारख असे, त्यांनी सर्जाच्या नजरेकडे पाहिले त्याच्या नजरेला नजर भिडविली. तसे त्या तरण्याबांड पोरांच्या जिवाची दिलाची भाषा राजांनी त्याच्या डोळ्यात पाहीली.

परंतु असा जवान उमदा मुलगा क्षणीक इनामाच्या मोहाला बळी पडू नये. म्हणून सर्जाला राजे म्हणाले, मर्द पोरा, अरे का आपल्या सोन्यासारख्या जिवाचा मरणाशी सौदा करतोस, जरा चांगला विचार कर. त्यावर जराही विचलित न होता न घाबरता, निश्चय ढळून न देता एका मोठ्या दांडग्या आत्मविश्वासाने तो राजांना म्हणाला, नाही राजे नाही. एकदा शब्द गेला म्हणजे गेला, आता माग घेणार नाही पण राजं एक विनंती हाय, बोलू ?

बोल सर्जा बोल काय पाहिजे काय? राजे म्हणाले तेव्हा मोठ्या विनयाने राजाच्या चरणाला वंदन करुन सर्जा म्हणाला महाराज ! आपण स्वतःचा फक्त आशिर्वाद द्या तुमचा हात माझ्या पाठीवरुन फिरवा म्हणजे कौल द्या हेच आशिर्वाद मला गडावर सुखरुप घेऊन येतील.

आणि महाराजांनी सर्जाच्या पाठीवरुन हात फिरविला व यशस्वीभव् ! असा आशिर्वाद दिला व गडावर चढून येण्याची मान्यता सर्जाला महाराजाच्या कडून मिळाली राजांना वाकून मानाचा मुजरा करुन एका वेगळ्याच आनंदात सर्जा



आपल्या कडसरी गावात येऊन पोहोचला आणि घाईघाईनी घरात जाऊन राधेची भेट घेतली आणि राधेन सर्जाला विचारल काय म्हणाले महाराज ! तेव्हा सर्जाने सांगितल, कि काय म्हणणार महाराज ! महाराज म्हणाले कि अरे सर्जा मर्दा ! तुझ्यासारखे बहाद्दर गडी स्वराज्याला हवे आहेत. अगं राधे आपला राजा फार मोठा किर्तीमान व दयाळू आहे त्याला शुराची मर्दाची जाणीव आहे.

सर्जाने राजांची भेट घेतली, तेव्हा तो राजांच्या भेटीने त्याचं गुणगान राधेजवळ गात होता आणि केव्हा रात्री झोप लागून गेली, हे कळलच नाही तो नकळत एक सुख स्वप्नं पाहण्यासाठी झोपी गेला.

पाहता पाहता दिवस पाखराप्रमाणे उडून गेले आणि आमावश्याची रात्र उगवली. ठरल्याप्रमाणे ठरल्यावेळी सर्जा, राधेस घेऊन आला त्याने आपल्या सोबत स्वतः तयार केलेला भक्कम असा दोरखंड लोखंडी अनुकुचीदार आकडा एक भगवे निशाण आणि एखादं दुसरं जंगली जनावर जर कदाचं अंगावर आलं तर बचावासाठी धारदार खंजीर आपल्या कमरेला बांधून ठेवलं होत. सर्जान आपली बायको राधा हिच्याकडे पाहीले. राधेन सोबत आणलेली मशाल जवळच्या जमिनित रोवली तिन सर्जाच्या कपाळी तेथील माती लावली दोघांनी एकाच स्वरात छत्रपती शिवाजी महाराज की जयं अशी ललकारी दिली सर्जाने राधेचां निरोप घेतला तिला काहीतरी सांगितलं सुचना दिल्या भरलेल्या कंठाण तिनं पण व्हयं धनी म्हणून होकार दिला. भराभर धावत सर्जामहार कड्याच्या पायथ्याशी गेला त्याने एकवार पुन्हा मनामध्ये धरणीमातेला आणि त्या उंचचउंच कड्याला नमस्कार केला एकदाच राधेकडे वळून पाहिले आणि हात उंचावला तसा राधेन ढोल वाजवायला सुरुवात केली. त्या ढोलाच्या नादावर इकडे सर्जाचे पाय त्या कड्यावर चढू लागले राधेच्या हातचा तो खाली वाजणारा ढोल सर्जाला प्रेरणा देत होता. एखाद्या घोरपडीने जसे दगडाला घट्ट चिकटून पकडून राहावे, तसा सर्जाही प्रत्येक दगडावरची आपल्या हाताची पकड घट्ट करीत होता प्रत्येक पाऊल सावधपणे

उचलत होता. सर्जाच्या डोळ्यापुढे आता एकच लक्ष होतं ते म्हणजे काहीही करुन कसंही करुन गडावर पोहोचायचं.

सर्जाने कोंझर नावाचं ठाण घाटले तेथील चौकी दाराला त्याने गुंगारा दिला तो पुढे निघाला बोलता बोलता त्याने रायगडाची खिंड घाटली एक वळसा घेऊन त्याने वाळूसरे खिंडीच्या वरच्या अंगाला असणाऱ्या पहारेकऱ्यानाही चकवा दिला. परंतु इथून पुढची गडावर जाण्याची वाट मात्र अत्यंत बिकट होती. एका बाजुला सरळसोट उंचचउंच कडा तर दुसऱ्या बाजुला अत्यंत खोल दरी त्या हातभर रुंदीच्या वाटेने वर चढून जाणे म्हणजे खरोखरच एक प्रचंड मोठ धाडस होत तरीही सर्जा हे धाडस करणारच होता सर्जाला वर खुणावत होती यशश्री, तर खालून ढोल वाजवून त्याची राधा त्याला प्रेरणा देत होती.

सर्जाने एका हातात कातळ घट पकडून धरला अनु दुसऱ्या हाताने लोखंडी आकडी गरगर फिरवून वर फेकली. दोर ओढून पाहिले असता ती आकडी दगडात फिट बसल्याची खात्री करुन घेतली तो दोर पक्का झाला हे ओळखून त्याने त्या दोरखंडाचे दुसरे टोक आपल्या कमरेभोवती घट्ट बांधून घेतले. आता सर्जाला आनंद झाला त्यांन एक वार शिवाजीराजांना व रायगडाला नमस्कार केला, आणि तो त्या कड्यावर चढू लागला आणि त्याचवेळी नेमका सोसाट्याचा वारा सुटला वातावरण बदलू लागले... पण... सर्जा... त्याला कशाचीच भिती वाटत नव्हती. तशातही मोठ्या धाडसाने त्यांनी शेवटचा टप्पा पार केला तो पठारी भागावर येऊन पोहोचला सावध सर्जान पहारेकऱ्यांच्या नजरा चुकवत गडाचा महादरवाजा गाठला तटाला दोर लावून सर्जा रायगडात शिरला तसा दगडी जिन्याने वाऱ्यासारखे धावत जाऊन त्याने हर हर महादेव अशी घोषणा देत राजांनी सांगितलेल्या अटीप्रमाणे किल्ल्याच्या तटावर भगवे निशाण रोवलेच सरळसोट कड्याजवळच्या बुरजावर उभे राहून राजे जातीने त्या तरण्याबांड सर्जाची रांगडी जिगर पाहत होते. कड्यावरुन गडात प्रवेश केला तटावर भगवा झेंडा फडविला. सर्जाने महाराजांना



पाहिल तर, ते स्वतःच कौतुक करीत भरल्या नजरेन सर्जाकडे येत होते.

पुढे होऊन सर्जाने महाराजांना वंदन केले महाराजांनी वारे बहादूर ! असे म्हणून त्याची पाठ थोपटवून त्यास अलिंगण दिले. त्याला गडावर विश्रांती घ्यायला लावून आणि उद्या सकाळी गावात जाऊन इनाम घेण्यासाठी सोबत आपल्या घरधनीला घेऊन ये म्हणून सांगितले. दुसऱ्या दिवशी ठरलेल्या वेळी भरलेल्या भव्य दरबारात सर्जा आपली पत्नी राधा हिला घेऊन इनाम घ्यायला हजर झाला. राधा भिरभिरत्या नजरेनं तो सारा थाटमाट पहात होती.

महाराजांच्या दरबारातले सरदार, सुभेदार शिलेदार भालदार, चोपदार सारेजण सर्जाकडे मोठ्या अभिमानाने आणि कौतुकाने पाहात होते. तोच महाराज दरबारात आले. सर्वांनी राजांना मुजरा केला महाराज सिंहासनावर बसले, अन् दरबारी कामकाजाला सुरुवात झाली ठरल्याप्रमाणे सर्जाला ठरलेला इनाम देण्यात आला. सर्जाची पत्नी राधा हिला सुध्दा महाराजांनी साडी चोळी बांगडी देऊन तिचाही यथोचित्त सन्मान करण्यात आला. सुमारे पंधरा दिवस राजांनी त्या दोघांनाही गडावर ठेवून घेतले आणि राधेसोबत सर्जा महाराजांचा निरोप घेऊन आपल्या घरी परत निघण्यासाठी चालला.

राजांनी मोठ्या आदराने, प्रेमाणे आणि आपुलकीने त्याची चौकशी केली. राजांचा निरोप घेताना सर्जा राजांना म्हणाला राजे! तुमच्या या स्वराज्याच्या कामात मला बी काहीतरी काम द्या किंवा सैन्यात घ्या.

सर्जाची हि त्यागी वृत्ती पाहून राजांच मन भरुन आलं, ते म्हणाले सर्जा! तुझ्या शब्दातुन तुझ्या भावना आमच्यापर्यंत पोहोचल्या जेव्हा तुझी गरज पडेल तेव्हा आम्ही तुझी जरुर याद करु, सर्जाला अतिशय आनंद झाला मुजरा करुन जायला वळाला तोच राजे म्हणाले सर्जा थांब! आता आम्हालाही तुला काहीतरी दयायचे आहे. पंताकडून एक हुकूमनामा लिहून गडाखालचे कडसरी गाव नावे करुन द्या, तसं पत्रही द्या आम्ही आमचा पण पुर्ण केला सरळसोट कडा चढून गडावर निशाण लावणाऱ्या या मर्दाला गडधुरंदर हा किताबही बहाल करावा असा हुकूम महाराजांनी काढला राजाच्या आज्ञेप्रमाणे पंतानी सर्व कागदपत्रे तो किताब

सर्वांच्या साक्षीने सर्जा महारास बहाल केला ते पाहून राधेच्या डोळ्यातून आनंदाश्रु वाहू लागले आता त्याची ओळख सर्जा महार राहिली नसुन आता तर तो मोठा मानकरी झाला होता. गडधूरंदर सर्जेराव वायदंडे म्हणून त्याची एक आगळी वेगळी ओळख तयार झाली होती. अशा ह्या पराक्रमी विरांचा इतिहास समाजासमोर येणे हि काळाची गरज आहे परंतु काही ब्राम्हणी लेखकांनी याची माहिती मुद्दाम दडविण्याचा प्रयत्न केला आहे तो समाजासमोर किंवा इतिहासाच्या पानातुन नष्ट आहे तो समाजासमोर किंवा इतिहासाच्या पानातुन नष्ट करण्याचाचं प्रयत्न झालेला दिसतो याला कारण तो महार जातीचा आहे म्हणून.





हा तुरापुरचा महार आहे.

# सावळ्या महार वंजारे (जठार)

खबरदार जर टाच मारुनी जाल पुढे चिधड्या ।

उडवीन राय राय एवढ्या ।

हे शालेय गीत आपल्या पैकी काही जुन्या जाणत्या माणसांनी शालेय जीवनात असताना एका कवितेत त्याचे गुणगान वाचलेच असेल, परंतु हा सावळ्या म्हणजे नेमका कोण? याचा मात्र कुणीही विचार नंतरच्या काळात केला नाही, तर त्या सावळ्या नावाच्या महार विरांची व पराक्रमाची कथा, मी आपल्याला ह्या पाठाद्वारे करित आहे.

सावळ्या हा लहानपणापासुन शुर, चप्पळ बलवान शरिराचा मुलगा होता त्याचे गाव पुण्याजवळ असणाऱ्या तुळापूर इथले हा सावळ्या रानावनात गुरे ढोरे चारुन स्वतःची व आपल्या आईबाबांची गुजरास करित असे. अशातच शिवाजी राजांनी केलेल्या एका एका पराक्रमाची माहीती त्याला त्याच्या सवंगड्याकडून मिळत असे. त्याला शिवाजी राजाच्या पराक्रमाची एक एक बातमी रोज ऐकावयाशी वाटत असे व त्या पराक्रमाच्या बातम्या ऐकल्यावर त्यालाही असं वाटायचं कि, मी ही शिवाजी राजाच्या सैन्यात जावं, आणि सैनिक होऊन मोटमोठे पराक्रम गाजवावे, असं त्याच मन नेहमी त्याला सांगत होतं परंतु काय करावे, कसे करावे, सैन्यात जायचं म्हणल्यावर कोण घेणार आपल्याला सैनिकांत, कुठे भेटावा लागेल. कुणास भेटाव? असं त्याच्या मनात सतत येत असे, आणि असाच त्याला त्याचा एक मित्र भेटला, आणि म्हणाला सावळ्या अरे मावळात कुस्त्याचं आखाड भरल्यात, तेव्हा तु येतो का कुस्त्या बघायला, झालं. तर सावळ्याला हेच तर हवं असायचं कारण त्याला झोप येत नसे, कधी एकदा त्या कुस्तीच्या आखाड्यात

जाईल, असं त्याला नेहमी वाटायच.

ठरल्याप्रमाणे दुसऱ्या दिवशी सावळ्या आपल्या मित्रासोबत मावळात तळेगाव दाभाडे येथे कुस्त्याचा आखाडा बघण्यासाठी सावळ्या आपल्या मित्रासोबत निघाला. तळेगावात पोहोचेपर्यंत संध्याकाळ झाली होती. कुस्त्यांचा आखाडा अजुन दोन दिवस बाकी होता, त्या रात्री त्यांनी व त्याचा मित्र जिवा दोघेही तेथील तळ्याच्या काठावर झोपली. सकाळी अंघोळ करुन सोबत आणलेली कालची शिळी झालेली भाजी भाकरी खाऊन कुस्त्याच्या ठिकाणी पोहोचली तेव्हा तेथे आखाड्याचा नारळ फुटला आणि कुस्ती सुरु झाली एकापाठोपाठ एकेक कुस्ती होत होती एकेक मल्ल आपली कसब तेथे गाजवित होता तेथील पंच मंडळी एकेक पैलवान हाताला धरुन जोड, येवद्या जोड असे ओरडत होती हे पाहून सावळ्यालाही वाटे कि आपण ह्याच्यासोबत कुस्ती करावी, परंतु सावळ्या पुढे गेला कि तेथील पंच मंडळी, तुझी ह्या पैलवानाबरोबर बरोबरी नाही, तुझ्या मापाचा जोड मिळाला, कि मग लावू तुझी कुस्ती असं म्हणून त्याला खाली बसण्यास सांगत. असाच तो दिवस सावळ्याला काही मोठ्या पैलवानाबरोबर कुस्ती खेळणास जोड मिळाला नाही. तेव्हा तेथे असणाऱ्या एका पंचाबरोबर सावळ्या बोलला कि, दादा मी लांबून आलोय तेव्हा मला एखादी कुस्ती खेळण्याची परवानगी द्या म्हणजे मी कुस्ती झाल्यावर आपल्या गावी निघून जाईन. पंचानी त्या सावळ्याकडे बारीक नजरेने पाहिले, तेव्हा त्याची शरिरयष्टी, त्याची बोलण्याची धडाडी, त्याचा कुस्ती खेळण्याचा आत्मविश्वास, पंचदादाच्या लक्षात आला. परंतु आजच्या सगळ्या कुस्त्या ठरुन झाल्या होत्या. तेव्हा कुस्तीस उद्याशिवाय सावळ्याला चान्स देता येत नव्हता तेव्हा पंच म्हणाले, अरे बाळ तु आजच्या दिवस थांब. म्हणजे तुला उद्या तुझ्या बरोबरीच्या पैलवानासोबत कुस्ती लावून देतो. त्यावर सावळ्याने समाधान व्यक्त करित त्या पंचदादाला होकार दिला.

परंतु पंचदादाने सावळ्याला संध्याकाळी आपल्या घरी जेवण्यास व



राहण्यास ये असे सांगितले. सावळ्या आपला मित्र जीवा यास घेऊन पंचदादा राहत होते त्या वाड्यात आले. तेथे असलेल्या जेवणावळीच्या सर्व पंगती चालल्या होत्या. अनेक नामांकित पैलवान ही त्या पंचाच्या घरी जेवणावळी साठी आलेले होते. सर्वांनी एकत्र पंगतीत बसून जेवण केले. पंचाच्या वाड्याच्या व्हराड्यात सावळ्या, व इतर आलेले पैलवान झोपी गेले. सावळ्याला थोड्या वेळातं जाग आली, उद्याच्या आखाड्याचे स्वप्न तो रंगवू लागला. मनातल्या मनात तो त्या पंचदादाचेही आभार मानु लागला. कधी एकदा सकाळ होते त्याची वाट पाहू लागला.

एकदाची पहाट झाली, सर्वजण तेथील तळ्यावर अंघोळीसाठी गेले. पंचानी नंतर त्यांच्या नाष्टा पाण्याची सोय केलेली होती. सर्व जमलेले पैलवान, सावळ्या वजीवा यांनी नाष्टा वगैरे उरकून आखाडा गाठला. नेहमीप्रमाणे पंचानी एकेक पैलवान हाताशी धरुन जोड मागू लागले, एकेक कुस्ती ठरु लागली, मग पंचदादाच्या लक्षात आले की, कालच्या पोराला आपण कुस्ती आज लावू असे सांगितले आहे. तेव्हा त्यांनी सावळ्यास हाक मारुन हाताशी धरले व नेहमीप्रमाणे त्याला हाताला धरुन जोड आहे, काय, जोड अशी आरोळी देण्यास सुरुवात केली. त्याबरोबर मावळ खोऱ्यातील एक नामांकित मल्ल उठून सावळ्यासोबत कुस्ती खेळायास पुढे आला. दोघांची कुस्ती ठरली. सावळ्याबरोबर कुस्ती ठरलेला तो पैलवानं त्या भागात नामांकित होता. त्याने अनेक मल्लावर या पुर्वी झालेल्या आखाड्यात विजय मिळविला होता, दोघांनाही तैयारी करण्याची मुभा पंचानी दिला, इतक्यात तेथील कुस्त्याचा जंगी आखाडा पाहण्यासाठी शिवाजी राजाचे काही सरदार दाखल झाले, त्यात तानाजी मालूसरे, शिवाजी राजाचे काही सरदार दाखल झाले, त्यात तानाजी मालूसरे सुर्याजी मालूसरे, इ. मात्तवर सरदार मंडळी आखाडा पाहण्यासाठी हजर झाली. तानाजी मालूसरे सुध्दा कुस्ती खेळण्यात एकदम पटाईत होते पुर्वी मावळ खोऱ्यात जेव्हा कुस्त्याचे आखाडे भरायचे तेव्हा शिवाजीराजे सुध्दा त्या आखाड्यात जातीने हजर राहत असत व तेथील नामांकित

पैलवानांचे कौशल्य पाहून त्यांना सैन्यात भरती होण्याचे आवाहन करीत असत. तानाजी मालूसरे सुध्दा पोलादपुर येथील आखाड्यात कुस्ती खेळत असताना शिवाजी महाराजांनी त्यास हेरुन लाल महालावर बोलावून घेऊन, त्यास सैन्यात भरती करुन घेतले होते शिवाजी राजेना आता ती फुरसत राहीली नव्हती म्हणून त्यांनी असली कामे तानाजीवर सोपविली होती. तानाजी मालूसरे माणूस हेरण्यात फार पटाईत असे. त्याची अचूक निवड कधीच चुकीची ठरली नाही. म्हणूनच जेथे जेथे कुस्त्याचे आखाडे भरले जाई तेथे तेथे तानाजीस पाठविले जायचे.

तानाजीला सैन्य भरतीचा अधिकारच महाराजांनी प्राप्त करुन दिला होता. चांगल्या शरिवृष्टीची, पिळदार बांध्याची तरुण मुले हेरुन ती महाराजांच्या पुढे उभी करायची व महाराजांनी त्याची एकदा पारख केली कि, मग लगेच सैन्यात भरती करुन घ्यायचे, असा त्या काळचा रिवाज होता. त्या काळात जातीभेद हा विषय विचारात घेतला जात नव्हता त्याची स्वराज्यावरील निष्ठा, इमान पाहूनच स्वराज्यात सामील करुन घेतले जायचे, मग तो कोणत्याही जातीचा अगर धर्माचा असो, तेथे फारसा त्या गोष्टीला थारा नसे,

पंचानी पुढील कुस्त्या आटोपाल्यानंतर सावळ्याची कुस्ती पुकारली, सावळ्या नावाप्रमाणेच सावळा होता परंतु त्याची शरीरवृष्टी अगदी कसलेल्या पैलवानासारखी होती. ठरल्याप्रमाणे दोघांची ही कुस्ती जुंपली कुस्ती जुपल्याबरोबर सावळ्याने विजेच्या चपळाईने डोळ्याची पापणी लवते न लवते, तोच समोरच्या मोठ्या पैलवानास चितपट केले. हे सारे दृष्य पाहून तेथे असणारे कुस्तीशौकीन मोठ्याने शाब्बास पोरा! शाब्बास! म्हणून अंगाखांद्यावर घेऊन त्याचे विजयी स्वागत करु लागले हा वेग तेथे उपस्थित असणाऱ्या तानाजी मालूसरे यांसही आवरता आला नाही त्यांनीही जोरात येवून सावळ्यास अलिंगण दिले. कारण समोरचा जो पैलवान होता त्याला आतापर्यंत त्या भागामध्ये कोणीही चितपट करु शकला नव्हता. ती सावळ्या नावाच्या अनोळख्या महाराच्या पोराने



त्या गाजलेल्या आखाड्यात करुन दाखविली होती तो दिवस आता मावळता झाला होता आता फक्त उद्याचाच दिवस कुस्तीचा शिल्लक राहीला होता. त्या रात्री पुन्हा ते सर्वजण पंचदादा च्या वाड्यावर मुक्कामाला गेले. तेथे आता अनेक नामांकित पैलवान मंडळी जमा झाली होती. सावळ्याजवळ येवून सर्व पैलवान मंडळी त्याच गाव नाव विचारु लागली. त्याला प्रेमाणे आपल्या शब्दात ओढू लागली. पंचदादाही त्याची कुस्ती खेळण्याची कला पाहून त्याच्यावर खुष झाले होते.

शेवटचा दिवस उजाडला! कारण शेवटच्या दिवशी फक्त विजयी झालेल्या मल्लाच्याच कुस्त्या एक मेकासोबत लावल्या जायच्या, शेवटच्या त्या दिवशी मोठे मोठे मल्ल आखाड्यात उतरले होते त्यात आता सावळ्याचाही नंबर लागला होता कालच्या कुस्तीने सावळ्याला मोठा धीर मिळाला होता. त्याचा आत्मविश्वास आता खुपच वाढला होता त्याच्या अंगी असणाऱ्या कला गुणांना आता वाव मिळणार होता.

आणि आखाडा सुरु झाला. एकामागून एक कुस्ती निघाली निघू लागली शेवटच मल्ल उरला. तो सावळ्यापेक्षा अतिशय धिप्पाड, उंच पिळदार शरिरवृष्टीचा मल्ल होता नेमकी त्याचं मल्लाबरोबर सावळ्याची कुस्ती ठरली. सावळ्या लंगोट नेसुन तयार होता.

तेथे उपस्थित असणाऱ्या तानाजी मालूसरे यांचे लक्ष त्या दोन्ही पैलवानावर लागले होते. दोघेही तोडीस तोड डाव टाकत एकमेकांवर टाकत होते सुमारे अर्ध्या तासाहून अधिक झुंज चालू होती प्रेक्षक वर्ग आ वासुन कुस्ती बघत होते अशी झकडपकड त्यांनी बऱ्याच दिवसानंतर पाहीली होती मध्येच एखादा प्रेक्षक अमुक एक बक्षीस जाहीर, तो ऐकून दुसराही म्हणायचा माझेही अमुक तमुक बक्षीस जाहीर, तानाजी मालूसऱ्यांनी तर हातातले सोन्याचे कडेच जो जिंकेल त्यास इनाम म्हणून जाहीर केले.

बघता बघता एका मोठ्या डावावर सावळ्याने समोरच्या पैलवानास

उचलला आणि क्षणाचाही विलंब न लावतां त्यास चितपट केले आणि कुस्ती जिंकली सावळ्यावर बक्षिसांचा वर्षाव झाला अनेक जणांकडून त्याला अनेक प्रकारची बक्षिसे प्राप्त झाली अशी बक्षिसे त्याने आजपर्यंत कधी पाहीली नव्हती त्याला प्रत्येकजण आपल्या खांद्यावर उचलून घेऊ लागला. सर्व वातावरण शांत झाल्यावर पंचदादा व इतर नामांकीत मंडळी त्याला आपल्या खांद्यावर घेऊन घरी विजयी मिरवणूक करुन नेले. संध्याकाळी त्याला पुन्हा पंचाच्या वाड्यावर मुक्काम करावयास लावला. संध्याकाळी तानाजी मालूसरे त्यांच्याजवळ आले आणि दोन तिन दिवसात राजगडावर येण्याचे आमंत्रण दिले व शिवाजी महाराजांची भेट घडवून आणण्याचे त्यास सांगुन आपल्या हातातील सोन्याचे कडे त्यास भेट म्हणून दिले. व तेथील स्वारास सांगुन सावळ्याला घोड्यावरुन नेऊन त्याच्या घरी पोहोच करण्यास सांगितले त्यानुसार सावळ्या आपल्या गावाला पोहोच झाला. आणि त्याच्या आई वडीलांना त्याने सारा झालेला प्रकार कथन केला. आणि उद्या मला राजगडाला बोलविणे आले आहे असेही सांगितले. हे ऐकून सावळ्याच्या आई वडीलांचा आनंद गगणात मावेनासा झाला, त्यांनीही सावळ्याला शिवाजी महाराजाच्या भेटीस जा असे सांगितले, व त्यास आशिर्वादही दिला.

दुसऱ्या दिवशी सावळ्या सकाळी सकाळी आपल्या आई वडीलांचे दर्शन घेऊन राजगडाच्या दिशेने निघाला, पायी चालणे हेच त्यावेळचे वाहन होते. त्यामुळे सोबत जेवणासाठी एक दोन वेळची शिदोरी घेऊन सावळ्या निघाला.

त्याआधी तानाजी मालूसरे व इतर मावळेवीर काल झालेल्या आखाड्याचे वर्णन महाराजांच्या जवळ करित होते त्यात त्यांनी महाराजाजवळ सावळ्याचे सुंदर वर्णन केले होते. तानाजीने वर्णन करणे म्हणजे हा माणूस पारखणारा माणूस म्हणून तानाजीची ख्याती होती. महाराजांनाही आता सावळ्या कसा आहे हे पाहण्याची घाई झाली होती. सावळ्या राजगडाच्या पायथ्याशी हजर झाला. तो उंचच उंच राजगड पाहून क्षणभर सावळ्या थबकला. गडाखालील पाहरेकऱ्यांना त्याने मला



राजगडावर बोलावणे झाल्याचं सांगितले, तेव्हा तेथील पहारेकऱ्याने सावळ्याला तेथेच थांबवून गडावर माणूस पाठवून सावळ्या नावाचा तुळापूर गावचा एक तरणाबांड मुलगा खाली आला आहे तेव्हा त्याला गडावर पाठवू काय? अशी सदरेवर जाऊन चौकशी केली, तेव्हा त्याला सदरेवर घेऊन या असं महाराजांनी त्यास सुचविले पहारेकरी खाली आला आणि सावळ्याला सोबत घेऊन राजगडावरील सदरेत पोहोचला, तेव्हा तिथे तानाजी मालूसरे, जिजाऊ आऊसाहेब व इतर नामांकित सरदार मंडळी बसली होती.

जिजाऊ आईसाहेबांनी सावळ्यास पाहताच, त्यांना अतिशय आनंद झाला. स्वराज्याच्या कामी अशा पिळदार शरिरयष्टीच्या माणसाची गरज दिवसेंदिवस वाढत होती. माँ साहेबांनी सावळ्यास प्रथम आपल्या खास माणसाकडून जेवणाची व्यवस्था करुन दिली आणि महाराज येईपर्यंत थांबण्याचा सल्ला दिला, इतक्यात महाराज गडावरील व्यवस्था पाहून तेथे हजर झाले त्यांनी सावळ्याला पाहीलं, तसं सावळ्याने महाराजास मुजरा केला. महाराजांनी सावळ्यास आपल्या खास स्वार पथकात त्यास नोकरी देऊन एक कामगीरी त्याच्यावर सोपविली, ती अशी कि, उद्या सकाळी राजगडाच्या खालच्या गुंजवणी दरवाजाच्या वाटेवर सकाळी पहारा देण्यासाठी हजर व्हायचं, आणि रात्र होईपर्यंत कुणालाही तेथुन कसल्याही परिस्थितीत आत येऊन द्यायच नाही, हे काम मी तुझ्यावर सोपवित आहे, प्रत्यक्षात मी जरी तेथुन आलो तरी मला सुध्दा आत जावून द्यायचे नाही. सावळ्यानं होकारार्थी मान हलवत कबुल केलं. सावळ्याला आता अतिशय आनंद झाला होता माझ्यासारख्या साध्या पोराला स्वराज्याचं काम करण्याची संधी मिळाली होती मी आता ती कशी इमाने, इतबारे पार पाडतो, ते बघाच! महाराज मनाशी सावळ्या पुटपूटू लागला. दुसरा दिवस उजाडला. सावळ्याने लष्करी मावळी झगा चढविला, रिवाजाप्रमाणे हत्यारे त्यास उपलब्ध करुन देण्यात आली, आणि मोठ्या जोशाने, त्वरेने, गुंजवणीच्या त्या वेशीच्या दरवाजासमोर जाऊन उभा राहीला. सकाळपासुन एकही माणूस त्या दरवाजाच्या दिशेने आला नाही,

दुपार झाली तरीही नाही सावळ्या एक सारखा नजर लावून येणाऱ्या वाटेवर लक्ष ठेवून होता.

आणि तिसऱ्या प्रहरेच्या वेळेत एक रुबाबदार घोडा त्यावर खास आकर्षक पोशाख गळ्यात मोठमोठ्या मोत्यांच्या माळा हातात मोठे रुबाबदार कडे, भरजरी टोप असा रुबाबी माणूस वेगात त्या दरवाजाच्या दिशेने आत निघाला. सावळ्याने एकदम मोठा आवाज करुन आपला घोडा थांबवा, असा आवाज केला, परंतु तो घोडेस्वार त्याला न जुमानता तसाच घोडा आत घेऊन जाऊ लागला तेव्हा सावळ्या त्या घोड्यासमोर आडवा उभा राहिला, मग त्या इसमाने सावळ्यास मला आत जाऊदे, माझे शिवाजी राजांकडे अत्यंत महत्त्वाचे काम आहे मला आडवू नकोस, मला आतापर्यंत ह्या राजगडाकडे जाण्यासाठी कोणीही रोखलेले नाही. तेव्हा हे मुला तु माझा रस्ता अडवू नकोस, सावळ्या मात्र त्याची कुठलीही विनवणी मान्य करत नव्हता, घोडेस्वार हताश झाला त्याला काही लाच देण्याचा प्रयत्न करु लागला गळ्यातील सोन्याचा कंठा सुध्दा त्याच्यासमोर ठेवला, परंतु सावळ्या मात्र ह्या प्रकाराने अधिकच भडकला, तो म्हणाला, अरे आमच्या शिवाजी राजांनी सांगितलेल्या कामगिरी पुढे असले, मोत्याचे, सोन्याचे कंठे आम्हास नको आहेत, तु कुणीतरी हेर आहेस, तेव्हा गुमान तु आता माघारी जा नाहीतर.

खबरदार जर टाच मारुनी जाल पुढे चिंधड्या उडवीन राय राय एवढ्या ही कविता ह्या ठिकाणी संपुर्ण लिहीत नाही परंतु सावळ्याच्या इमानदार वागण्याचे दर्शन घडविणारी हि कवीता आहे. शिवाजी राजांनी सावळ्याचे लालभडक झोलेले ते डोळे हेरले. त्याची इमानी, त्यांची निष्ठा, शिवाजीराजांनी पाहिली आणि खरोखरच हा वीर स्वराज्याची इमाने इतबारे चाकरी करील याची खात्री पटली आणि आपले खरे स्वरुप सावळ्यापुढे प्रगट केले, तेव्हा सावळ्या मात्र मनातून एकदम खजिल झाला. परंतु महाराजांना त्याची एक प्रकारे परिक्षाच घ्यायची होती. तो मह्र आहे, चलाख आहे परंतु त्याची इमानी कशी आहे ह्याची पारख शिवाजी



राजे स्वत: करुन घेत असत, म्हणूनच तर स्वराज्याची कमान नेहमी चढतीच राहीली.

यानंतर महाराजांनी खरोखरचं गळ्यातील काढलेला तो सोन्यामोत्याचा कंठा सावळ्यास खरोखर त्याच्या इमानदारीबद्दल त्याला बक्षिस देऊन त्याचा भर दरबारात सत्कार केला, व त्याला स्वराज्याच्या सेवेत कायमचे दाखल करुन घेतले. व तानाजी मालूसऱ्याकडून त्यास हुलपथकाची जबाबदारी देण्यात आली. मराठा लष्करातील पायदळातील नौकरीला जे महार सैनिक राहात असत त्यांना पाईक म्हणून ओळखण्यात येई, या पाईक सैनिकांत जो महाराचा मुख्य असे त्याला नाईक किंवा नायक म्हणत असत. पुढे त्यांचा म्हणजे नायक शब्दाचा अपभ्रंश नाक असा झाला, प्रत्यक्ष लढाईच्या मैदानांवर आल्यास त्या सैनिक अधिकाऱ्याच्या मदतीला शिवाजी राजांनी दोन अस्पृश्य पाईक असत. त्यातील एक त्याचे रक्षण करणारा व दुसरा त्यांच्या घोड्याला दानापाणी देणारा असे, तो स्पृश वर्गातील मराठा अधिकारी जर जातीभेदाने पछाडलेला असल्यास या अस्पृश्य पाईकांच्या अपमान करी, तरीपण त्याचा अपमान व मानहानी सहन करुनही सोडून जात नसे. कारण त्यांना शिवाजी राजांनी निर्माण केलेले हे स्वराज्य वाढविण्याचे काम चोखपणे करावयाचे होते. आणि हा त्यांच्या पोटपाण्याचा आता सन्माननीय व्यवसाय झाला होता. त्याच बरोबर महार पाईकात आत्मसमर्पणाची भावना, अगदी सुरुवातीच्या काळापासून भिनलेली असे. एवढेच नव्हे तर ती पाईकाची नोकरी महार लोकांची जवळ जवळ वंशपरापरागत हकाची बाब झालेली होती.

महार सैनिक पाईक म्हणून ज्या कोणत्या मुसलमान अगर मराठा सरदाराच्या नौकरीत रहात असत. त्या धन्याशी ते अत्यंत इमानदारीने वागत असत वेळ प्रसंगी आपले प्राण संकटात टाकून आपल्या धन्याचे रक्षण करीत असत. लढाईच्या प्रसंगी लढतालढता जर शत्रु सैनिकांचे कैदी झाले तरी, शत्रुने

त्यांना कितीही मोठे आमीश दाखविले तरीही महार लढवय्ये सैनिक शत्रुला शरण जात नसे. त्यांचा कितीही जरी शत्रुने छळ केला तरी ते एखादी सुध्दा गुप्त बातमी शत्रुला सांगत नसे हे विशेष होय. एकदरीत हा महार समाज इमानदार आहे हे ओळखूनच शिवाजी महाराजांनी त्याचा योग्य सन्मान राखून योग्य ती पदे देऊन त्यांना स्वराज्याच्या कामात सामावून घेतले. खरे स्वरुप सावळ्यापुढे प्रगट केले, तेव्हा सावळ्या मात्र मनातून एकदम खजिल झाला परंतु महाराजांना त्याची एक प्रकारे परिक्षाच घ्यायची होती. तो मल्ल आहे. चलाख आहे परंतु त्याची इमानी कशी आहे, ह्याची पारख शिवाजीराजे स्वत: करुन घेत असत म्हणूनच तर स्वराज्याची कमान नेहमी चढतीच राहीली.

शिवाजी राजांनी जेव्हा स्वराज्य स्थापनेचे कार्य हाती घेतले, तेव्हा त्यांची नजर प्रथम शुद्र–आणि अतिशुद्र जमातीवर त्यांनी आपले लक्ष वेधले या माणसांचा उपयोग स्वराज्य स्थापनेच्या कामी आपणास होऊ शकतो हे त्यांच्या चाणाक्ष बुध्दीने जाणले शुद्र–अतिशुद्रातील काटक, शुर व इमानदार अस्पृश्य वर्गातील एका विशिष्ट अशा महार जातीवर त्याचे लक्ष होते. त्या काळात महार जात प्रामुख्याने किल्ल्यांच्या कामी मोठ मोठे दगड वर चढविणे, फोडणे, तळी खोदून त्यातुन भले मोठे बांधकामासाठी वापरण्यात येणारे दगड बाहेर काढणे, किल्ल्यातील लोकांना धान्य, जळाऊ लाकुड, वैरण पुरविणे चोर दरवाजे, गुप्त भुयारे यांचे तोंडावर थांबुन राखण करणे. जंगलातील दऱ्या–खोऱ्यात रात्रंदिवस पहारा देणे, किल्ल्यात येणाऱ्या जाणाऱ्या प्रत्येक माणसावर नजर ठेवणे. मोठ मोठ्या अवजड तोफां किल्ल्यावर नेऊन पोहोच करणे, लढाईच्या प्रसंगी त्या रणांगणावर ओढून नेणे, वेळ आलीच तर स्वत: त्यात दारुगोळा ठसून शत्रुवर तोफांचा बडीमार सुध्दा करत असतं. त्यात काही संकट ओढवले तर शत्रुला सरळ सरळ भिडून त्यांचे परिपत्य सुध्दा करीत असतं.

हे ओळखूनच प्रत्येक गडाखाली शिवाजी राजांनी महार लोकांसाठी



राहण्याची सोय करुन दिलेली आढळते आजही रायगड किल्ल्याच्या खाली पाचाड गावात पाचाड गडाभोवती संपुर्ण महार समाजाचीच वस्ती आढळते शिवाजी राजांनी स्वराज्य स्थापनेच्या कार्यात हजारो महार लोकांचा उपयोग करुन घेतला, असल्याचे इतिहासात आढळते. शिवाजी राजाच्या काळात ज्यांनी ज्यांनी आपले प्राण गमाविले व शौर्य गाजविले त्या महार विरांना त्यांनी ठिकठिकाणी इनामी जमीनी प्राप्त करुन दिल्या आहेत काहींना सोन्या–चांदीचे कडे, व शेला पागोटे दिले, तर काहींना कोतवालकी व काहींना पाटीलकीही दिली तशी काही पत्रे आजही उपलब्ध आहेत.

महाराष्ट्राच्या असंख्य खेड्याचा कारभार एका विशिष्ट पध्दतीने अनेक काळापासून चालत आलेला आहे. खेडेगाव म्हणजे एक प्रकारचे स्वयंपुर्ण राज्यचं असायचे त्यातील लोकांच्या गरजा त्या काळी गावातच भागत असत. त्या गावातील कारभार प्रामुख्याने देशमुख, देशपांडे, पाटील, परवारी, कुलकर्णी, चौगुले, मोकाशी, शेटे, महाजन वगैरे त्या गावातील वतनदार मंडळी असायची त्यांना तेथील असणाऱ्या वतनदाराकडून काही शेती हक्क म्हणून मिळालेल्या असायच्या त्या शेतीवर मराठी, कुणबी, महार, मांग, चांभार, ढोर गोंड, गोवारी, इत्यादी जाती जमातीचे लोक शेती करुन धान्य पिकवित आणि जो ठरविक वाटा आहे तोच ताब्यात घेऊन आपला चरितार्थ चालवत असत. महाराष्ट्र प्रदेशात राहणाऱ्या नागवंशीय महार, लोकांचे आचार–विचार अगदी साधे असून ते प्रामाणिक व स्वाभीमानी आहेत ते आपल्यावर प्रेम करणाराशी प्रेमाणे वागत असत परंतु कोणी जर सुडविचाराने त्याच्याशी वागले तर ते त्याचा सुड उगविल्या शिवाय रहात नसत. ते आपला अपमान धुवून काढण्यासाठी स्वत:च्या प्राणाची पर्वा न करता शत्रुला संपवून टाकत असत. आपल्या धन्याशी ते नेहमी प्रामाणिकपणे वागत असत.

लढाईत रणांगणावर हजारो शत्रुंना आव्हान द्यायचे असेल तर, महार

जातीचा आपल्याला मोठाच फायदा होईल, हे शिवाजी राजांनी ओळखून स्वराज्याच्या स्थापनेच्या कामात त्यांनी त्याचा उपयोग करुन घेतला हे सत्य कोणासही नाकारता येणार नाही महाराष्ट्रामध्ये शिवाजी राजांनी स्वराज्य स्थापनेचे घेतलेले काम म्हणजे एक मोठा धाडसी निर्णय होता संपुर्ण भारतात मुसलमानी सत्ता असताना सुध्दा त्या विरुध्द शिवाजी राजांनी केलेले हे बंड मोठे संकट होते, आणि त्यांनी परकीय सत्ता झुगारुन आपले स्वराज्य स्थापनेचे कार्य पुर्ण केले. आणि त्यांच्यात असलेले देशप्रेम जागे केले. शिवाजी महाराजांनी प्रत्येक जातीचा उपयोग त्यांच्या उपजत असलेल्या गुणापासून करुन घेतला म्हणूनच सर्व जातीच्या रयतेत त्याच्याविषयी असलेल्या आदराची व श्रध्देची भावना निर्माण झाली.

स्वराज्याच्या संरक्षणासाठी त्यांनी बाजीप्रभु देशपांडे, मुरारबाजी देशपांडे, तानाजी मालूसरे, कान्होजी जेधे येसाजी कंक प्रतापराव गुजर हंबीरराव मोहीते, बाजीकाका पासलकर नेताजी पालकर, सर्जेराव जेधे, संताजी घोरपडे, धनाजी जाधव, हिरोजी फर्जद. मदारी मेहतर, नागनाक महार, रायनाक महार, इत्यादी महार मंडळींनी केलेली स्वराज्य स्थापनेची कामगिरी सुध्दा मोठी अभिमानाची आहे हे येथे लक्षात ठेवण्याजोगे आहे.

हुलपथक –

मुघल बादशहा औरंगजेबाच्या सैनिकावर व प्रदेशावर शिवाजी राजांनी एक सारखे आक्रमण सुरु केले. व त्याचा मुलूख एकामागून एक काबीज करु लागले त्यामुळे शिवाजी राजाच्या या हल्ल्याला प्रतिबंध करण्यासाठी व मराठी सत्ता नेस्तनाबुत करण्याच्या इरायाने औरंगजेबाने आपला मामा शायीस्तेखान, यांस भरपूर सैन्याची कुमक देऊन, दारुगोळा, हत्ती उंट, घोडे, पैसा इत्यादीसह शिवाजी राजाचा बंदोबस्त करण्यासाठी महाराष्ट्रात पाठविले.

शहिस्तेखान दिल्लीवरुन मजल दरमजल करीत इ.स. १६६० च्या फेब्रुवारी



महिन्यात महाराष्ट्रात आला. तो पुण्याजवळ आला, व त्याने शिवाजी राजांचा पुण्यातील लालमहाल काबीज करुन तेथे राहू लागला. वाटेत येताना त्याने सुपे व बारामती जवळची अनेक गावे लुटून आणली त्याचे जवळ त्यावेळी सुमारे ९०,००० हजार घोडेस्वार व २५ हजार पायदळ व प्रचंड तोफखाना होता. पुण्यात लाल महालात त्याचा मुक्काम पडल्यानंतर त्याने त्या प्रदेशातील वतनदार मंडळी आपल्याला येऊन मिळावी म्हणून मावळ प्रांतातील अनेक गावे वाड्या वस्त्या पांडे लुटण्यास सुरुवात केली. प्रचंड दहशत पुण्याच्या आसपास निर्माण केली.

याच वेळी शिवाजी महाराज नुकतेच सिद्दी जोहरच्या वेढ्यातून सुटून राजगडावर दाखल झाले होते शिवाजी राजांनी त्याची माहीती काढून घेऊन एक अजब कल्पना आपल्या डोक्यात आणली, पुण्यात लाल महालाभोवती मोगलांच्या लष्करी छावण्या जागोजागी पडल्या होत्या. सिंहगडापासून पुण्याकडे येणाऱ्या सगळ्या वाटेवर रजपुताच्या टोळ्या, छावण्या त्याने तैनात केल्या होत्या अशा सर्वावर मात करुन लाल महालात शिरुन खानावर रात्रीच्या वेळेस हल्ला करुन त्याला ठार मारण्याचा बेत महाराजांनी आखला होता या सर्व लष्करी छावण्या, व पहारे यांची नजर चुकवून लाल महालात शिरणे म्हणजे प्रत्यक्ष मृत्युला कवटाळणे सारखे होते. परंतु स्वराज्या निर्मितीसाठी हा धोका पत्करण्याचे आव्हान शिवरायांनी स्विकारायचे ठरविले. त्यांनी आपल्या सैन्यातील शुर इमानदार महार व मराठे योध्दे निवडून त्याची एक फळी तयार केली. त्या सर्वांसाठी मोगली पोशाख तयार करुन घेतले त्यांच्याबरोबर तानाजी मालूसरे, मोरोपंत पिंगळे या आपल्या विश्वासु सरदारांच्या हाताखाली दोन दोन हजारांची फौज देऊन मोगली छावण्यापासून थोडे दुर उभे राहण्यास सांगितले हा सर्व प्रकार अंधाऱ्यारात्री केला असल्यामुळे मोगली सैन्यास त्याचा थांगपत्ता सुध्दा लागला नाही. महाराजांनी व इतर सर्व त्याच्यासोबत असणाऱ्या मावळ्यांनी मुसलमानी पेहराव घातल्यामुळे हा आपल्यापैकीच मोगल सरदारांच्या टोळ्या आहेत असे मोगली तळावर भास निर्माण झाला. आणि ते पुण्याच्या दिशेने रुबाबात घोड्यावरुन निघाले. चौकी पहारे वाटेत

आडवे आले कि, ते न डगमगता त्यांना सांगत कि, आपण मोगल लष्करातील सैनिक असुन बंदोबस्त करण्यासाठी मावळात गेलो होतो आणि आता आम्ही माघारी फिरलो आहोत.

त्या मोगलांच्या छावणीत त्याच्याबद्दल जराही संशय येत नसे. कारण अशा मोगल सरदारांच्या तुकड्या व त्याची जा-ये रात्रंदिवस सुरु असायची.

शिवाजी राजांनी आपला विश्वासु सावळ्या महार व इतर ३०० महार जातीचे मावळे व ५०० मराठे यांना घेऊन थेट पुण्यात शिरले बाकीच्या लोकांना त्यांनी आसपास फक्त मोगली सैनिक पहारा देत आहोत म्हणून इकडे तिकडे उगाचच नजर ठेवण्यास सांगितले. तो रमजानचा महिना होता मुसलमान लोक दिवसा उपवास करतात व रात्रीच्या वेळेस भरपूर जेवतात त्यामुळे ते दिवसभर उपाशीच राहात असत. हा त्यांच्या धर्मानुसार त्याचा रिवाज आहे. लाल महालात मुक्कामास असलेले शायीस्तेखानाच्या कुटुंबातील असलेली त्याची बायका रांडा, पोरे सेवक, नोकर मंडळी शाही पाकखान्यात तयार झालेल्या गोड धोड पदार्थावर ताव मारुन निवांत झोपी गेली होती.

अर्धि रात्रउलटण्याची शिवाजी महाराज व मावळे वाट पाहात होते आणि मध्य रात्र होताच आपल्या सोबत सर्व योध्याना लाल महालाच्या खास अंधाऱ्या जागा हेरुन तेथे उभे करुन १०० निवडक अशा महार व मराठे विरांना घेऊन मध्यरात्री गुपचुप लाल महालात प्रवेश केला. हा शिवाजी राजांचाच लालमहाल असल्याने त्यांना या लाल महालांची खडान खडा माहीती होती या रात्री शिवाजी राजांनी लाल महालातील स्वयंपाक घरात प्रवेश केला. तेथे औरंगजेबाचा राज्यारोहन सोहळा चालू असल्यामुळे नगारखान्यात नगारा वाजविण्याचे काम चालू असल्यामुळे नगारखान्यात नगारा वाजविण्याचे काम चालू होते. याच सुमारास सावळ्या महाराने त्यांच्या १५ साथी दारासह नगारा वाजविणाऱ्या त्या लोकांस ठार मारुन त्या नगार खान्याचा ताबा घेतला. आणि नगारा मोठमोठ्या



वाजवू लागले नगारखान्यातील चौघडे, ढोल, ताशे ऐन मध्यरात्री मोठमोठ्याने गरजु लागले. त्यांच्या प्रचंड आवाजामुळे लालमहालात चाललेली गडबड शायीस्तेखानाच्या खास सुरक्षेवर असलेल्या वीस हजार हत्यारबंद फौजलाही कळली नाही.

बालपणीच स्वराज्याचा कारभाराचे धडे महाराजांनी लालमहालातच गिरविल्यामुळे त्यांना आपल्या वाड्याची संपुर्ण माहीती होती. स्वयंपाक घराची खिडकी खोदून त्यांनी आत प्रवेश मिळविला, खानाने स्वतःच्या सोयीसाठी कापडी पडद्याच्या खोल्या बनविल्या होत्या महाराजांनी तलवार मारुन ते कापडी पडदे कापून टाकले आणि क्षणातच आपल्या सोबत असलेल्या मावळ्यांना घेऊन खानाच्या शयनगृहापर्यंत पोहोचले. महाराजांच्या हालचालीमुळे शायिस्तेखानाच्या जनान खान्यातील बायका जाग्या झाल्या.

त्यांनी जोर जोरात आरडा ओरडा सुरु केला. त्यामुळे खानाचा मुलगा तलवार घेऊन पळत आला त्याला महाराजांनी तलवारीच्या एका घावात धडावेगळे केले. जनान खान्यात असणाऱ्या खानाच्या बायका घाबरुन खानाचा जीव वाचावा, म्हणून खानाच्या शयन गृहात आल्या आणि त्यांनी खानाला सावध केले महाराज खानाला शोधत होते नेमके याच वेळेरा खानाने आपला जीव वाचविण्यासाठी सैरावैरा पळू लागला. अफाट मोगली फौजेच्या या क्रुर सरदाराच्या अंगावर झेप घेऊन महाराजांनी आपल्या तलवारीने जोरदार खानावर वार केला खिडकीतून उडी टाकतांना खानाच्या हाताच्या बोटावर बसला त्याच्या हाताची चार बोटे तुटली, इतक्यात महालातील दिवे त्याच्या बायकांनी विझविले व सैतान, सैतान असा आरडा ओरडा सुरु केला. आता लाल महालात जास्त वेळ थांबणे बरोबर नाही असे समजून महाराज व सर्व मावळे तेथुन निघाले. सर्वजण आधी ठरल्याप्रमाणे पुणे सोडून हिंगण्याच्या आंब्याच्या बागेत पोहोचले. तोपर्यंत पहाटेची

चाहुल लागली होती तानाजी मालूसरे बावाजी देशपांडे तसेच सर्व महार वीर व मराठा वीर सिंहगडाच्या दिशेने निघाले.

मावळ्यांनी हिंगण्याच्या आंमराईत ठरल्याप्रमाणे इशारा करताच, कात्रज घाटामध्ये ठेवलेल्या महार पथकाने बैलाच्या शिंगावरील व झाडावरील जळते टेंभे पेटविले. व महारांच्या त्या पथकाने जोरजोरात ढोल वाजविण्यास सुरुवात केली. महाराज व त्याचे मावळे कात्रज घाटामध्ये आनंद साजरा करीत आहेत. असे खानाच्या फौजेस वाटले, खानाचे दहा हजाराहून अधिक सैनिक अंधारात मोठ्या रागाने महाराजांच्या पाठलागासाठी कात्रजच्या घाटात पोहोचले.

परंतु तेथे प्रत्यक्षात झाडावरील टेंभे व धावणाऱ्या बैलाच्या शिंगावरील टेंभे पाहून खानाचे सैन्य हिरमुसले, ढोल, नगारे आदी वाजविण्याचे साहीत्य तेथेच टाकून महार व मावळे कात्रजचा घाट ओलांडून पुरंदर किल्ल्याच्या दिशेन फरार झाले. व इकडे महाराजही आपल्या महार विरांसोबत व मराठ्यासोबत सुखरुप सिंहगडावर पोहोचले. वीस हजार सैन्याच्या खड्या पहाऱ्यात राहणाऱ्या महाभयंकर अशा क्रुर खानावर महाराजांनी छापा टाकला खानाच्या जिवावर आले होते. ते बोटावर निभावले त्यामुळे घाबरलेला खान पुणे सोडून औरंगाबादला पळून गेला.

अफजलखानाप्रमाणेच या शायीस्तेखानाने शिवरायांना जीवंत अथवा मृत पकडण्याची प्रतिज्ञा केली होती. अफजलखानाच्या मृत्युमुळे जसा अदिलशाहील कायमचा धक्का बसला. तसाच मोठा जबरदस्त धक्का खानाची बोटे तुटल्यामूळे मोगल शाहीस बसला, ह्या दोन्ही प्रसंगाचे शिवरायाचे धाडस पाहून महार सैनिकास विशेष आत्मविश्वास वाटला ते ही जिवाची पर्वा न करता स्वराज्यासाठी हवे ते धाडस करु लागले, आशा या पराक्रमी महार विरांचा इतिहास काही नादान लेखकांनी पुढे येऊ दिलां नाही. याचेच एक आश्चर्य वाटत राहते. अशा प्रकारे महार योध्यानी पुण्यातील आपली कामगिरी चोखपणे व प्रामाणिक पणे पार पाडली व स्वराजाचा पाया मजबुत केला या महार विरांच्या शौर्याला इतिहासात तोड नाही.





# रायनाक महार

शिवाजी महाराजांनी अफजलखानाचा वध केल्यानंतर, विजापुरच्या अनेक प्रदेशावर अचानक हल्ले करुन मोठा मुलूख काबीज केला. या प्रचंड विजयाने मावळी मनगटे जुलमी मोगलांचा खात्मा करण्यासाठी उसळू लागली महाराजांच्या जवळच्या महार रायनाक सेनेने एक तुकडी तयार केली. त्यांनी अदिलशहाच्या ठाण्यातील दक्षिण महाराष्ट्रातील सांगली, कोल्हापूर, मिरज वसंतगड, रांगणा, खेळणा, विसापुर इ. गड व त्याच्या सभोवतालचा प्रदेश अवघ्या दोन माहीन्यात काबीज केला. विश्रांती न घेता महाराज व त्याचे मावळे, कष्टकऱ्याचे स्वराज्य बळकट करण्यासाठी अहोरात्र पाऊस वाऱ्याची तमा न बाळगता मोगलांच्या ताब्यातील प्रदेश जिंकत होते तेथील प्रजा ही महाराजांच्या मागे खंबीरपणे उभी राहु लागली. त्यामुळे बारा मावळातली शेतकरी, बलूतेदार, महार, मांग, रामोशी समाज इ. जाती जमातीचे लोक स्वराज्यात येऊन दाखल होत होते, महाराजांचे बळ यामुळे वाढत चाललेले पाहून, अदिलशहा चिंता करत बसला होता.

त्याने अतिशय धुर्त सरदार सिध्दी जौहर यास साठ हजार सैन्य, दारुगोळा देऊन शिवाजीचा बिमोड करण्यासाठी रवाना केले. शिवरायांच्या महार व मराठा सैनिकांचा बंदोबस्त करण्यासाठी चालून आलेल्या सिद्दीने २ मार्च १६६० रोजी. महाराज पन्हाळ्यावर असताना त्यास वेढा दिला. त्याच्या मदतीला अफजलखानाचा पुत्र फाजलखान आणि ईस्ट इंडीया कंपनीचा अधिकारी हेन्री रेव्हिंग्टन तोफेसह हजर झाले जौहरने विशाळगडासही वेढा दिला. वेढा अत्यंत कडक होता त्याच वेळेस नेमका शायीस्तेखान पुण्यात येऊन लाल महालात तळ देऊन बसला शिवरायांना पन्हाळ्यातून सोडविण्यासाठी जिजाऊनी तयारी सुरु केली. व राजगडावरुन त्या पन्हाळ्याकडे निघाल्या, त्यावेळी नेताजीनी माँ

साहेबास साकडे घातले. व राजगडावर परत पाठविले. वेढा उठवून सिद्दी जाईल असे वाटत होते मात्र भर पावसाळ्यात सिद्दी आपल्या सैन्यास चिकाटीने दक्ष राहण्यास सांगत होता. यात काही महीने गेले. तरी वेढा उठण्याचे चिन्ह दिसेना नेताजी पालकर, व प्रतापराव गुजर यांचे बरोबर असलेले महार सैनिक व मराठा सैनिक रात्री बेरात्री सिद्दीच्या सैन्य छावणीवर छापे घालत असत. मोगलांना कापत असत. ह्यामुळे सिद्दीच्या सैन्यात हाहाकार माजला. जोरदार कोसळणाऱ्या पावसात व थंडगार वातावरणात गडाच्या पायथ्याला मुक्काम करणेही मोगली फौजेला कठीण झाले होते.

असे असले तरी सिद्दीचे सैन्य रात्रदिवस आळीपाळीने जागून होते. गडावरुन मुंगीलाही खाली जाता येणार नाही इतका कडक वेढा सिद्दीने तैनात ठेवला होता. आता गडाबाहेर कसे पडायचे ? या विचारात महाराज असतानाच त्यांच्या गुप्तहेर खात्यात असणारा मावळी वीर शिवा काशीद हा महाराजांच्या पायाजवळ येवुन बसला. शिवा काशीदाचा चेहरा महाराजांच्या चेहऱ्याशी मिळता जुळता होता. तो महाराजांना म्हणाला राजे, तुम्ही सिद्दी जोहरला तहासाठी निरोप पाठवा, मी तुमचे सारखाच दिसतो. एक पालखी आणि तुमचा संपुर्ण पेहराव पोशाख मला द्या, मी स्वतः राजे म्हणून जोहरच्या भेटीला जातो व तुम्ही त्यावेळेस साध्या मावळ्यांच्या वेशात गडाबाहेर पडा यावर महाराज म्हणाले. कष्टकऱ्यांच्या स्वराज्यासाठी माझ्या मावळी विरांनी माझ्या डोळ्यासमोरच अग्नीकुंडात उडी घ्यावी, आणि मी पहात राहावे. हे बरोबर नाही. शिवा काशीद म्हणाले, महाराज जसा तुम्ही स्वराज्याचा विचार करता, तेव्हा आम्हास काय वाटत असेल, तेव्हा महाराजांनी त्यास तु स्वतः मृत्युला कवटाळण्यास तयार झाला आहेस, तुला काही दगा फटका झाला तर ? यावर शिवा काशीदाने महाराजांच्या डोक्यावर आपले पाय ठेवले व त्यांना मुजरा करत, तो त्याच्या समोर उभा राहीला, आणि म्हणाला मला दगाफटका होणार नाही, झालाच तर माझ्या सारखे अनेक शिवा काशीद निर्माण होतील, पण तुमची स्वराज्याला गरज आहे.

शिवा काशीदाच्या या प्रामाणिक आणि आवेश पुर्वक बोलण्याने राजे



गहीवरले, शिवा काशीदाला कोणी ओळखेल का? याची खात्री करण्यासाठी राजांनी त्यास स्वतःचा पेहराव देऊन दुपारी गडावरील अधिकारी कर्मचारी यांचे सत्कार शिवा काशीद याचे हस्ते केले शिवा काशीदास कोणीही यावेळी ओळखले नाही. राजांची खात्री पटली व त्यांनी सिद्दी बरोबर तहाच्या वाटाघाटी सुरु केल्या, व मी आपल्या भेटीस गडाखाली प्रत्यक्ष येत आहे असा त्यास निरोप पाठविला. १२ जुलै १६६० चा दिवस उजाडला महाराजांनी दोन पालख्या तयार केल्या एका पालखीत शिवा काशीद व दुसऱ्या पालखीत शिवाजीराजे एकसारखाच पेहराव घालून बसले दोन्ही पालख्या बरोबर समान मावळे सैन्य घेऊन रात्री १० वाजता गडातुन बाहेर पडले. महाराजांच्या वेशातील शिवा काशीदाची पालखी सिद्दी जोहरच्या तंबुकडे जावू लागली त्याची बातमी जोहरला मिळाली.

पराक्रमी शिवरायांचे स्वागत करण्यासाठी सिद्दी स्वतः पायी चालत मध्यान्ह रात्रीच महाराजांच्या पालखीकडे निघाला त्याने महाराजांच्या वेशातील शिवा काशीदास महाराज समजून मुजरा केला. महाराज तहासाठी गडाखाली आले, असल्याची बातमी वाऱ्यासारखी मुघल सैन्यामध्ये पसरली, इतके दिवस डोळ्यात तेल घालून पहारा द्यावा लागत होता, आता थोडी विश्रांती मिळणार म्हणून मोगली फौजा आनंदाने नाचू लागल्या. जोरदार कोसळणाऱ्या पावसाला व मावळ्यांच्या अचानक हल्ल्याला ते कंटाळले होते. शिवाजी महाराज खाली आले हे समजल्यावर सर्वजण गाफील झाले.

सिद्दी गाफील आहे, हि संधी साधून मध्य. रात्रीस महाराज पन्हाळगडावरुन निघाले, सरदार बाजीप्रभु देशपांडे रोहीडा हिरडस मावळातील महार सैनिक व वेळवंड खोऱ्यातील निवडक मराठे त्यांनी सोबत घेतले होते. चिखल. तुडवत धो-धो कोसळणाऱ्या पावसात घनदाट जंगलातून मार्ग काढत. चौक्या व पहारे चुकवित ते गडाच्या खाली आले. व तेथुन निसटले. हि बातमी सिद्दीस समजली त्याने आपला जावई व फाजलखान यास ताबडतोब पाच हजार सैन्य देऊन महाराजांचा पाठलाग करण्यास सांगितले. मावळे जिवाकडे न पाहता मुसळधार पावसात चिखल तुडवित डोंगर-कपाऱ्यातून वेगाने धावत होते. पन्हाळ्यापासून पावसात

चिखल तुडवित डोंगर-कपाऱ्यातुन वेगाने धावत होते. पन्हाळ्यापासून चार कोसांचे अंतर कापल्यानंतर सुर्य उगवला त्यावेळी सिद्दीच्या अफाट फौजा भर वेगाने आपल्या पाठलागावर येत आहे हे महाराजांनी ओळखले रात्रीच्या धावपळी मुळे मावळे थकून गेले होते. हे महाराजांनी ओळखून ते चिंतेत पडले. अशाही परिस्थितीत शिवाजी राजांनी सिद्दीच्या अफाट फौजेचा सामना करावा असा निर्धार केला. तो पर्यंत घोडखिंड लागली. खिंडीपाशी महाराची पलटण जमा झाली यावेळी बाजीप्रभु देशपांडे यांनी पुढे होऊन महाराजांना विनंती केली कि, मी या मावळ्यांना घेऊन खिंडीचे तोंड रोखून धरतो, आपण पुढे व्हावे आम्ही प्राणपणाने लढू पण सिद्दीच्या सैन्याला इंचभरही पुढे जाऊ देणार नाही. बाजीच्या या आवेशाने महाराजांना समाधान वाटले. ते घोडखिंडीच्या तोंडावरुन पुढे निघाले बाजीच्या अती आग्रहाने महाराज निवडक महार व मराठे मावळ्यासह विशाळगडाकडे रवाना झाले. घोडखिंडीत अरुंद वाटेत अवघ्या तिनशे मावळे, त्यात शंभुसिंह जाधव, बांदल रायनाक महार असे बलदंड सैनिक होते.

सिद्दीची फौज त्वेशाने खिंड चढु लागताच झाडीत लपलेल्या महार मावळ्यांनी हरहर महादेव गर्जना करुन त्याच्यावर दगड धोड्यांचा तुफानी मारा करण्यास सुरुवात केली रात्रंदिवस पायपीट करुन थकले, असल्यामुळेही त्यांनी त्यांचा जोश कायम ठेवला कारण स्वराज्याच्या रक्षणासाठी ते महार वीर आपल्या प्राणांची बाजी लावून दगडाचा तुफान मारा करित होते. शिवाजी राजांचे मावळे म्हणून त्यांना मोठा अभिमान वाटत होता. एक एक महार हजार मोगलांना भारी पडत होता त्यांच्या अंगात हत्तीचे बळ चढले होते.

इकडे महाराजांची पालखी गडाच्या दक्षिणेकडील भागाकडे वेगाने निघाली सिद्दीच्या गाफिलपणाचा फायदा शिवाजी महाराजांनी अगदी सावधपणे घेतला होता. जोहरच्या तंबुत शिवाजी राजांना ओळखणारा अफजलखानाचा पुत्र फाजलखान होता त्याला महाराजांच्या वेशातील शिवा काशीदचा संशय आला त्याने हा खरा शिवाजी नसून दुसरा कोणीतरी आहे हे त्याने ओळखले आणि तो म्हणाला आप सचमुच शिवाजी राजे है? तेव्हा फाजलखानाने जिरेटोप मागे



घेण्यास सांगितले. कारण ब्राम्हण कृष्णा कुलकर्णीने शिवाजी राजांच्या कपाळावर अफजलखान भेटीवेळी वार केला होता. त्याच्या जखमेची खुण शिवाजी राजाच्या कपाळावर होती. ती खुण त्याला दिसली नाही. तेव्हा त्याने शिवा काशीद व त्याच्या बरोबरच्या पालखीत असणाऱ्या भोयांना व मावळ्यांना ठार मारण्याचे आदेश दिले. तंबुतच या पाचही जणांचा शिरच्छेद करण्यात आला. प्राण सोडण्यापुर्वी शिवा काशीद म्हणाला, आमचा राजा हा जुलमी मोगलांना कधीच पकडता येणार नाही. त्याची पाठही पाहता येणार नाही. खऱ्या शिवाजीचा विचार सोडून द्या.

मृत्यू समोर दिसत असताना शिवा काशीदाने स्वराज्यासाठी आपल्या प्राणांचे बलिदान दिले. धो-धो कोसळणाऱ्या पावसात थंडीत आपल्या दणकट मनगटांनी मावळे मोगली फौजेवर तुफान दगड फेक करीत होते. बाणाचा मारा करत होते. या जोरदार व तुफान हल्ल्यात सिद्दीचे सैन्य पटापट रणांगणावर पडत होते. त्यामुळे सिद्दीचे सैन्य घनदाट जंगलांना व वीर मावळ्यांच्या तुफानी हल्ल्याला घाबरुन मागे फिरले. शेकडो मोगल रायनाक महाराने ठार मारले.

तेवढ्यात फाजलखान बापाच्या वधाचा सुड घेण्यासाठी पुढे आला. त्याने झाडीत, खिंडीत लपून मारा करणाऱ्या महार सैनिकावर जोरदार हल्ला केला. मोगली फौज व मावळ्याचे घनघोर युद्ध सुरु झाले. फाजलखानाच्या मदतीला, पाठीमागून पाच हजार सैन्य आले मोगलांचे सैन्य दहा हजार झाले. आणि इथेतर फक्त ३०० चं. तरीही मावळे लढत लढत मोगल सैनिकावर मारा करित त्यांना खिंड चढु देत नव्हते. घोड खिंडीचा निमुळता मार्ग त्यानी रोखून धरला होता. निम्मे अधिक मावळे धारातिर्थ पडून घोडखिंड त्यांच्या रक्ताने न्हावून निघाली. फाजलखानाच्या नव्या दमाच्या फौजेने तिसरा हल्ला चढविला. मावळे व महारवीर मोठ्या जोशाने पुन्हा लढु लागले बाजीप्रभु दोन्ही हातात पट्टे चढवून शत्रुंची एक सारखी कत्तल करत सुटला होता तर बांदल, थोपट, सडे विचारे,धुमाळ, कंक आणि रायनाक महार अदिमावळे आपल्या अतुलणीय शौर्याने मोगली फौज मारु लागले. स्वराज्यासाठी मावळेवीर प्राणावर उदार होऊन अतुलणीय पराक्रम गाजवित होते.

मुठभर मावळे मुघलांवर भारी पडत होते दोन प्रहर हा रणसंग्राम एकाच ठिकाणी सुरु होता. दोन दिवस पोटात अन्न नसताना मोगलांचे प्राण घेणारे महार लोकांच पथक सिद्दीच्या सैन्याला आपला काळचं वाटू लागले. बाजीच्या शौर्य पराक्रमामुळे मावळ्यामध्ये विरश्री संचारली होती स्वराज्याच्या प्राणांचे रक्षण ह्या पलीकडे त्यांना काहीही दिसत नव्हते. बाजीप्रभु देहभान होऊन लढत होता. महाराज विशाळगडावर पोहोचल्याच्या इशारती अद्याप ऐकावयास येत नसल्याने तो सिंहासारखा झुंज देत होता. दुदैवाने शत्रुच्या गोळीने नेमका बाजीच्या छातीचा डाव घेतला. तो रणबहाद्दर सेवक धरणीवर कोसळला त्या समयी स्वत:च्या प्राणापेक्षा तोफेचा बार कानी पडण्याची किंमत त्यास भासु लागली त्याने धरणी धरली, आणि रायनाक महाराने ती जागा घेतली. रायनाकाने शत्रु पुन्हा रोखून धरला त्याने दोन्ही हातात दांडपट्टे घेतले तो विजेच्या वेगाने त्यांची मुघल फौजेची मुंडकी उडवू लागला शत्रु सैनिक मागे हटला आणि याच वेळी विशाळगडावर महाराज पोहोचल्याचे तोफांचे बार ऐकू आले, आणि बाजीने आपला मुजरा महाराजास करुन प्राण सोडला.

रायनाक महार सुध्दा महाराजांना प्रणाम करुन त्यानेही आपला देह घोडखिंडीत ठेवला या गोष्टीची इतिहासात नोंद घेण्याची कोणी तसदी घेतली नाही. कारण रायनाक हा विर पुरुष महार जातीचा होता म्हणून. तो अस्पृश्य जातीचा असल्यामुळे त्याच्या बलीदानाची किंमतही इतिहासात शुद्रच ठरविली गेली आहे. त्याच्या शौर्याला, बलिदानाला इतिहास विसरु शकणार नाही.

बाजीप्रभुचे व फुलाजी प्रभुचे रायनाकाचे प्रेत इतर महार लोकांनी विशाळगडावर पोहोच केले कर्तव्य दक्ष रायनाकाचे शौर्य पराक्रम ऐकून महाराज आश्चर्यचकीत झाले. त्याच्या कार्याची दखल घेऊन शिवाजी महाराजांनी सर्व महार विरांना काही गावच्या पाटीलक्या व कसण्यासाठी जमीनी देऊन त्यांचा यथार्थ गौरव केला.





# महार विरांची कामगीरी

स्वराज्याचे बळ वाढले होते. ठिकठिकाणी लाखाची फौज सज्ञ होती. डोंगरी प्रदेशाबरोबरच मैदानी मुलूख तसेच समुद्रावरही महाराज प्रभुत्व गाजवित होते. त्याचा शत्रुपक्षाने चांगलाच धसका घेतला होता महाराजांचे सरदार तानाजी मालूसरे, येसांजी कंक, धोंडनाक महार गोदाजी जगताप अदि मावळेवीर महत्त्वाची कामगिरी पार पाडत होते तानाजी मालूसरे कोकण भागाचे सुभेदार होते. त्यांनी कोकणात चांगली दहशत बसविली होती. अनेक फितुरांना त्यांनी यमसदनास पाठविले होते व स्वराज्याचे बळ वाढविले होते. कोकणातील पोलादपूर जवळील, उमरठे येथे ते राहात होते, त्यांचा जन्म पाचगणीजवळ गोडवली येथे झाला. त्यांच्या वडीलांचे नाव काळोजीराव होते तानाजी व सुर्याजी लहान असताना मोगलांच्या हल्ल्यात काळोजीचा मृत्यू झाला होता.

तानाजी हा मोठा हिम्मतवान गडी तो अंगाने छिप्पाड होता. ताकदीने बलवान होता. बुध्दीने चलाख होता त्याची महाराजावर अलोट भक्ती होती, शक्ती, भक्ती व बुध्दी व या सर्व गुणांचा पुजारी असलेला तानाजी मालूसरे हा स्वराज्याचा मोठा आधारवड होता. शिवरायांनी जयसिंगास पुरंदरच्या तहात दिलेले तेविस किल्ले आद्यापही मोगलांकडेच होते कोंढाणा हा त्यातील एक किल्ला बारा मावळ प्रदेशाच्या मध्यवर्ती केंद्र असलेला हा गड प्रजेच्या स्थैर्यासाठी स्वराज्यात असणे अत्यंत गरजेचे होते. याच गडावर शहाजी राजांनी स्वतंत्र राज्याचा झेंडा फडकविला होता येथेच जिजाऊंनी बाळ शिवबाला स्वराज्याचा महामंत्र दिला. याच गडाच्या पंचकोशीत शिवबा रांगत रांगत लहानाचा मोठा झाला. एके दिवशी जिजाऊ शिवरायांना म्हणाल्या शिवबा, समोरच्या किल्ल्यावर मोगलांचे निशान फडकत आहे हा बळकट किल्ला मोगलांच्या हाती असण बरं नाही तो परत घे.

पुण्याच्या पश्चिमेला घनदाट जंगली प्रदेशात मुठा मोसे व शिवगंगा नद्यांनी – दुर्गम डोंगरांनी वेढलेला कोंढाणा स्वराज्यात असावा म्हणून शिवरायांनाही मनोमन पटले.

शिवरायांनी कोंढाणा किल्ला घ्यायचा संकल्प केला. ते कोंढाण्यावर स्वारी करण्यासाठी सज्ञ झाले. कोंढाणा हा अतिशय अवघड असल्यामुळे तो जिंकण्यास कठीण होते.

इकडे तानाजी मालूसरे यास आपण असतांना महाराज कोंढाण्यावर स्वारी करणार, हि गोष्ट आवडली नाही तानाजी म्हणाला महाराज! आम्ही जिवंत असताना असल्या जिवावरच्या कामगिरीवर आपण जाणार? मग आम्ही कशाला? ते काही नाही आधी लगीन कोंढाण्याच मग रायबाचे, मीच कोंढाणा जिंकणार. मला फक्त आशिर्वाद द्या, महाराजांनी तानाजी मालूसऱ्यांची या कामगीरी साठी निवड केली. चार दिवसांवर आलेले मुलाचे लग्न थांबवून तानाजी मालूसरे यांनी ३०० मावळ्यांना बरोबर घेतले. त्यात सुमारे १०० सैनिक हे महार जातीचे निवडले व ते राजगडावरुन खाली उतरले तो दिवस होता ३ फेब्रुवारी १६७० सोबत आपला बंधु सुर्याजी व धोंडनाक महार या बहादूर विरासही सोबत घेण्यास तानाजी मालूसरे विसरले नाहीत, कोंढाण्यावा रात्री हल्ला करण्याचे ठरविले. सुर्याजीस काही कुमक देऊन त्याला कल्याण दरवाजा उघडल्यावर किल्यात प्रेवश करण्याचे काम सुर्याजीवर सोपविले होते. आणि तानाजी व धोंडनाक महार व त्याचे सोबतची २०० महार सैनिक घेऊन किल्ल्याच्या पायथ्याशी काळोख्या रात्री उभा राहीला.

तानाजी रात्रीच्या दुसऱ्या प्रहरी, सरळ सपाट उभ्या मजबुत कड्यावर सुमारे अडिचशे ते ३०० फुट उंच असलेल्या कड्यावर यशवंती नावाची घोरपडीला दोर बांधून वर सोडली तीला वर सोडल्यावर ती सरळ वर जाऊन गडाच्या तटाला आपली नखे रोवून बसली. घोरपडीला बांधलेल्या दोरावरुन धोडनाक हा महार शिपाई प्रथम वर गेला व त्याने तो दोर एका खडकवजा झाडाला घट्ट बांधला नंतर एकेक करुन सुमारे २०० मावळे वर आले धोंडनायक महार पळत कल्याण दरवाज्याच्या बाजूला गुपचूपणे आला आतील पाहेरेकरी जागे होत त्यांना जागेवरच ठार मारुन कल्याण दरवाजा उघडला तसे सुर्याजी, शेलारमामा व इतर शुरविर



मावळे आत घुसले कोळी बांधवाचेही एक पथक गडावर दाखल झाले. एकच हलकल्लोळ माजला हर हर महादेव प्रचंड कापाकापी सुरु झाली. ह्या आवाजाने किल्लेदार उदयभान राठोड जागा झाला त्याने आपल्या ५ हजार हत्यारबंद सैनिकांला लढण्यास सज्ञ केले काळोख असल्याने होळीचा माळ, बालेकिल्ला अमृतेश्वर मंदिराच्या पुढे मोठमोठे ढेंबे पेटविले गेले.

मोगली सैनिकाला तानाजीच्या नुसत्या नामोचराने घाम फुटला तानाजीच्या पराक्रमाची त्यानी अनेक वेळा फक्त चर्चाच ऐकली होती आता साक्षात शुर तानाजी व त्याच्या बरोबर असणाऱ्या मराठे व महार सैनिकांशी झुंज द्यावी लागणार, या भितीनेच अर्धी मोगली फौज गर्भगळीत झाली. गडावर प्रचंड धुमश्चक्री उडाली अंधाऱ्या रात्रीत पळापळ सुरु झाली. अर्धवट झोपेतून जाग्या झालेल्या बायका मुले ओरडू लागली.

तानाजीने मोगली फौजेला लढण्यासाठी ललकारले नगारा वाजला. मोगली सैतानाचा आता निकाल लावलाच पाहिजे. या इर्षेने तानाजी पेटून उठला. त्याने उदयभानच्या डोक्यावरुन तलवार गरंकन फिरविली दोघांत तुंबळ युद्ध सुरु झाले, इकडे महार शिपायांनी प्रयत्नाची शिकस्त केली त्यांना कशाचेच भान राहिले नव्हते त्यांनी मोघल सैनिकांची खांडोळी करण्याचे तंत्र अवलंबिले. तशातच धोडनायक महार हा सर्व सैनिकांस लढण्यास उत्तेजन देत होता कल्याण दरवाजाच्या बाजूला सुर्याजी बेफान होऊन मोगल सैन्याची खांडोळी करत होता.

तानाजी व उदयभानची अंधाऱ्या रात्रीत चाललेली लढाई मोठी जिकरीची होती दोघेही वीर बळदंड होते एकामेकांसमोर ते हार मानायला तयार नव्हते सुमारे अर्धा तास त्याच्यात युध्द सुरु असतानाच नियतीने डाव साधला, तानाजीची ढाल तुटली, तरीही त्याची पर्वा न करता कमरेचा शेला काढून तानाजी त्याचे वार अडवित होता, परंतु एकेरी लढत किती वेळ टिकणार तानाजीचा हात उडाला. तसा तानाजी जमीनीवर कोसळला गेला तरीही तानाजीने आपल्या हातातील तलवार गिरकी मारुन उदयभानचे मुंडके उडवून दिले. दोघेही पडले. इकडे तानाजी पडला आहे हे पाहील्यावर मावळ्यांचा धीर खचला ते पळू लागले परंतु धोंडनाक

महार व सुर्याजी दोघेही पळत येवून त्यांनी मराठा सैनिकांला धिर दिला व लढण्यास सज्ञ केले. त्यानंतर महार शिपायांनी एक मोठी व लढाई केली की, गडावरील सर्व मोगल सैन्य माघार घेऊ लागले. उदयभान पडला हे ऐकल्यावर मोगल सैनिकांनी हातवर करुन आपल्या तलवारी खाली ठेवल्या आणि शरणागती पत्करली एकट्या तानाजीने या वेळी दोनशे मोगली सैनिकाठार मारले होते तितकेच सैनिक धोडनाक महाराने मारले होते. सुर्यांनी व शेलारमामा यानीही मोठे रण गाजविले. कोळ्याच्या तुकडीने तर एवढा पराक्रम गाजविला कि: गडावरील सर्व मोगली सैन्याची हत्यारे तोफा हत्ती घोडे आपल्या ताब्यात घेतले.

स्वराज्याचे भगवे निशाण गडावर फडकले सेनापती मृत्युमुखी पडला तरी शिवरायांचे मावळे मागे हटले नाहीत. कोंढाण्याच्या पंचक्रोशीतील १६० कोळी ९० महार व ६० मराठे या लढाईत मारले गेले. गडावर गंजी पेटवून कोंढाणा जिंकल्याची खबर महाराजांना व जिजाऊ आईसाहेबांना देण्यात आली पालखीत घालून नरविर तानाजीचा मृतदेह राजगडाकडे नेण्यात आला. शिवरायांनी आपल्या या बाल पणीच्या जिवलग मित्राच्या शवावर अश्रु वाहीले. महाराज म्हणाले. गड आला पण माझा सिंह गेला, कोंढाण्याचे नाव बदलून सिंहगड असे ठेवण्यात आले. तानाजी मालूसरे यांच्या बलिदानाने सिंहगड राष्ट्रीय शक्तीस्थळ बनले. नरविरांच्या पावन स्मृती आपणास पवित्र भारत भुमिच्या स्वराज्याचा जिवंत इतिहास सांगत आहे असा भास होतो स्वराज्याच्या इतिहासात प्रतापगड, घोडखिंड (पावनखिंड) पुरंदर व सिंहगड या चार लढाया अत्यंत महत्त्वाच्या ठरल्या शिवरायांच्या स्वराज्य स्थापनेच्या कामीत्या चिरंतन स्मृती बनून राहील्या पण या कोंढाण्याच्या लढाईत विशेष पराक्रम गाजविणारा धोडनायक महार याच नावही इतिहास लिहीत नाहीत याचे आश्चर्य वाटते. कारण तो महार जातीचा असल्यामुळे काही नतदृष्ट इतिहासकार ह्या शुरविराचे नाव मात्र लिहित नाहीत. परंतु त्याची स्मृती त्याची नावे इतिहासाला बुजविता येणार नाहीत हे लक्षात ठेवा.





वरळीम एडु वगा

३।।८।५